# दोन शब्द.

या पुस्तकाच्या प्रारंभींच 'उपक्रम' लिहिला असल्या मुळें
तंत्र प्रस्तावना लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं तरी पण पुस्तकासंबंधीं
हीं विशिष्ट गोष्टी अवशिष्ट राहिल्या असल्यामुळें त्यांच्या पूर्णतेसाठीं
ोन-शब्द लिहिले तर ते अस्थानीं होणार नाहींत.

'अहिंसा' हा सर्वसामान्य सिद्धांत आहे, असें असून शास्त्रीय
ज्ञानता, शास्त्रीय मोह, शौक आणि जिव्हेंन्द्रियांची लोलुपता वगैरे
नेक कारणामुळें संसारांत हिंसेची एवढी मोठी प्रवृत्ति वाढत गेलेली
देसून येते कीं त्या प्रवृत्तीला आळा घालण्यासाठीं पुष्कळ प्रयत्नांची
जरूरी आहे. या प्रयत्नां पैकींच या विषयावर निरनिराळ्या भाषेंत लेख,
लहान लहान बोधप्रद गोष्टी, हस्तपत्रकें व स्वतंत्र पुस्तकें प्रसिद्ध करणें
हा एक मार्ग आहे. या विषयावर आतां पावेतों पुष्कळ लेखकांनीं
'यावद् बुद्धिबलोदयम्' या नियमानुसार यथाशक्ति प्रयत्न केले आहेत
त्यांत विशेष करून परमगुरु शास्त्र विशारद-जैनाचार्य श्री विजयधर्म
सूरि ए. एम. ए. एस. बी. महाराज यांनीं 'अहिंसादिग्दर्शन'
नांवाचें हिंदी भाषेंत पुस्तक लिहून जे उपकार केले आहेत ते अगदीं
अनिर्वचनीयच आहेत.

अशाच प्रकारच्या एका गुजराती भाषेच्या पुस्तकाची पण खास
अवश्यकता दिसत होती. यामुळें निराळ्याच तऱ्हेवर गुजराती पुस्तक
लिहिण्यांत आलें आहे.

पुस्तकांत केवळ धर्मशास्त्रांतीलच प्रमाणें देऊन मनुष्यांना अहिंसा
धर्माकडे वळविण्याचा प्रयत्न केला नसून, धर्मशास्त्रांतील प्रमाणा बरोबरच

शारीरिक नियम वगैरे लक्षांत घेऊन हिंसेची आणि मांसाहाराची प्रवृ
मनुष्य प्राण्याला किती नुकसानकारक आहे हेंही प्रसंगोपात ठि
ठिकाणीं दाखविण्यांत आलें आहे. या विषयीं येथें जास्त लिहि
निरर्थक आहे, कारण हातच्या कांकणास आरसा कशाला ? वाच
तेआपोआप समजतीलच. गुजराती पुस्तक लिहिण्याचे कामीं 'अहिंस
दिग्दर्शन ' ( हिंदी ) 'बलिदानेर शास्त्रीय सिद्धांत' ( बंगाली
'बांगालार इतिहास प्रथम भाग' (बंगाली) व इतर दुसऱ्या वेळोवेळ
प्रसिद्ध झालेल्या कित्येक लेखांचा आधार घेण्यांत आलेला आहे.

गुजराती पुस्तक परम पूज्य मुनिश्री विद्याविजयजी यांनीं लिहि
लेलें आहे व मुनीश्रींच्या गुजराती पुस्तकाचा प्रस्तुत पुस्तक अनुवा
आहे.

' अहिंसे ' सारख्या वादग्रस्त प्रश्नांना उहापोह आणि तोही स
तऱ्हेनें पूर्ण–विरोध करणाऱ्यांच्या प्रत्येक प्रश्नाचें समपर्क, साधार उत्त
–एवढ्याशा लहान पुस्तकांत मूळ ग्रंथकारास देणें सर्वथैव अशक्य होतें
व तेवढ्या मुळेंच या लहान पुस्तकांतून कांहीं शेळकीं वाक्यें काढून घेऊन
त्यांवर मांसाहार करणाऱ्या कडून विरोध होण्याचा संभव आहे. प
त्या सर्व प्रश्नांना मूळ ग्रंथकार उत्तर देण्याला समर्थ आहे. स्थल संक
चा मुळें कांहीं कांहीं बाबतींत प्रमाणबद्ध चर्चा कमी करावी लागली अ

एखाद्या विषयाचें प्रतिपादन करतांना आपला मुद्दा सिद्ध क
वयाचा असल्या म्हणजे साधारणतः लहान लहान गोष्टी देखील
आणून आपण आपला मुद्दा सिद्ध करतों व तसें करण्याच्या
आपल्या प्रतिपक्षाला आपल्या म्हणण्या पासून वाईट वाटेल की क
अथवा आपण सभ्यतेची मर्यादा उल्लंघीत आहों की काय याचा आपण
[illegible] विसर पडतो.

अहिंसा धर्म स्थापन करण्याच्या प्रतिपादनांत कदाचित चुकून मूळ ग्रंथकारानें अथवा अनुवादकानें चर्चेचें उल्लंघन केलें असल्यास व कदाचित या लेखापासुन कोणाचें मन दुखविलें गेल्यास तशा मनुष्यांची अनुवादक क्षमा मागत आहे. अहिंसा धर्मासाठीं अनुवादक "कोणाचें मन दुखवणें" ही देखील हिंसा आहे असें मानतो; आणि म्हणूनच या ठिकाणीं कोणाचेंही मन दुखविण्याचा अथवा कोणच्याही धर्मावर टीका करण्याचा मूळ ग्रंथकाराचा अथवा अनुवादकाचा हेतु नाहीं हें येथें स्पष्टपणें नमूद करण्यांत येत आहे.

प्रकाशनाला विलंब होऊं नये म्हणून परभारें जामनगराहून या पुस्तकांचीं प्रुफें तपासून पाठविल्याबद्दल व अनुवादांत उपयुक्त सूचना केल्याबद्दल मी माझे मित्र श्रीयुत रा. रा. बाळकृष्ण काशीनाथ विद्वांस–बालकवि–यांचा आभारी आहे.

शेवटीं हें पुस्तक वांचणारे अहिंसा धर्माचे उपासक होवोत व "आत्मवत् सर्वभूतेषु" या सत्य सिद्धांताला सदोदित आपल्या अंतःकरणांत वागवोत हीच अनुवादकाची इच्छा आहे.

हें पुस्तक वाचून फक्त एकच मनुष्य जरी वरील तत्त्वाचें पालन करूं लागला तरी अनुवादकाचे श्रम सफळ झाले असें वाटून अनुवादकास आनंद होईल.

तो दीन दयाघन सर्वांना सद्बुद्धि देवो.

सुदामापुरी
मुकुंदाश्रम–२८-८-१८
कृष्णाष्टमी सं. १९७४

सौभद्र.

# अनुक्रमणिका.



॥ अर्हम् ॥

परमगुरुश्रीविजयधर्मसूरिभ्यो नमः

# अहिंसा.



## उपक्रम.

मनुष्य जातीचें अंतःकरण आंतरिक रीतीनें तपासण्यात आलें, तर असें स्पष्टपणें दिसून आल्या शिवाय राहणार नाही की, प्रत्येक मनुष्याच्या हृदयात नैसर्गिक दयेचें अस्तित्व असतें. इतर सर्व मनुष्याची गोष्ट तर राहूं द्या, परंतु क्रूरांत अत्यंत क्रूर अशा एका मनुष्याचें अंतःकरण तपासुन पाहिलें तर तेथें देखील दयेचा संचार अवश्य दिसून येईल. उदाहरणार्थ एक कसाई, ज्याचा दररोज असंख्य जीवांची हत्या करण्याचा धंदा आहे—जो असंख्य जीवाचा रोज संहार करतो—तो रस्त्यानें कोठें जात असला आणि त्याच्या असें नजरेस आलें कीं एक प्रबल कुत्रा दुसऱ्या एका दुर्बळ कुत्र्याला फाडीत आहे तर हें दृश्य जरी तो कसाई आहे तरी त्याच्यानें खास बघवणार नाहीं आणि त्या दुबळ्या कुत्र्याची सुटका केल्या शिवाय अथवा त्याच्या सुटकेचा प्रयत्न केल्या शिवाय त्या कसायाच्यानें कधींही राहवणार नाही. दोन कुत्र्याचें भांडण तो सोडवीलच मग हा प्रताप कोणाचा ? त्याच्या अंतःकरणातील नैसर्गिक दयेचाच! मनुष्याचें अंतःकरण अनीति, अधर्म आणि अन्याय याला सहन करुं शकत नाही याचें हें प्रत्यक्ष प्रमाण आहे. ज्याच्या बरोबर आपला कोणत्याही प्रकारचा संबंध नसतो, त्याला देखील यदाकदाचित कोणी मारुं लागला, लुटूं लागला अथवा कोणत्याही प्रकारानें त्रास देउं लागला तर तो देखावा पाहातांक्षणींच

आपण त्या मनुष्याला त्रास होऊं नये म्हणून अथवा त्या मनुष्याचा त्रास अजीबात नाहींसा व्हावा म्हणून शक्य तितका प्रयत्न करतों. सारांश तें कार्य करण्याला यदा कदाचित आपण असमर्थ असलों अथवा आपल्या अंगीं तें कार्य करण्याची शक्ति नसली तरी देखील तें कार्य करण्याची प्रेरणा केल्या शिवाय आपलें अंत.करण तर राहणार नाहींच. या वरुन देखील आपणाला असेंच दिसुन येईल कीं मनुष्य मात्राच्या अंतःकरणांत दया ही असतेच. असें असून देखील या मायावी प्रपचांत पुष्कळ मनुष्यांची प्रवृत्ति आपण याच्या उलट बघतों. मनुष्यमात्राच्या हृदयांत दयेचा झरा एकसारखा वाहत असून देखील कित्येक शिकार करतांना, कित्येक मांसाहार करतांना, कित्येक देवी, अंबा, काली, म्हाळसा क्षेत्रपाल वगैरे ग्रामदेवतांच्या समोर पशुवध करतांना, कित्येक यज्ञयागांच्या निमित्तानें पश्वादिकांचा वध करतांना आणि कित्येक अशाच दुसऱ्या तऱ्हेनें जीवहिंसा करतांना दृष्टीस पडतात. या सर्वांची कारणें देखील निरनिराळीं आहेत. शौक, शास्त्रीय व्यामोह, शास्त्रीय अज्ञानता आणि जिह्वेंद्रियांची लोलुपता—वगैरे कारणामुळेंच मनुष्य आपल्या अंत.करणांतील नैसर्गिक दयेला गमावून बसलेला अथवा गमावून बसण्याच्या तयारींत असलेला दिसून येतो. या लहानशा पुस्तकांत याच विषयाचा शास्त्रीय सिद्धांत आणि युक्तींच्या द्वारें परामर्ष करण्यांत येईल. कोणत्याही विषयाचा विचार करतांना शास्त्रीय सिद्धांतावर लक्ष पुरविणें जितकें अगत्याचें आहे, तितकेंच किंबहुना त्याहूनही अधिक लक्ष युक्तीवर सुद्धा दिलें पाहिजे. याच बाबतींत नीतीकार असें म्हणतात कीं.—

> " केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो विनिर्णयः ।
> युक्तिहीनविचारे तु धर्महानिः प्रजायते " ॥ १ ॥

अर्थात्—केवळ शास्त्राचा आश्रय घेऊन कोणत्याही विषयाचा

निर्णय करतां उपयोगी नाहीं; अथवा निर्णय करूं नये. कारण युक्ती वाचूनच्या विचारानें धर्माची हानि होते.

म्हणून या विषयाचें प्रतिपादन करतांना देखील शास्त्रीय सिद्धांतांची प्रमाणें देतांना त्या बरोबरच युक्तीचा देखील आश्रय करण्यांत येईल.

## सामान्य धर्म.

मनुष्याच्या नैसर्गिक धर्मा बाबतींत कोणीही दर्शनकार किंवा मतमतांतरवादि भिन्न भिन्न विचारांचे असूं शकत नाहींत. कारण मनुष्यमात्राचे नैसर्गिक धर्म एकसारखेच असतात. कोणत्याही देशाचा, कोणत्याही धर्माचा, कोणत्याही जातीचा अथवा कोणत्याही समाजाचा मनुष्य असें बोलण्याचें केव्हांही धाडस करूं शकणार नाहीं कीं— असत्य बोलण्यांत धर्म आहे; कोणीही म्हणणार नाहीं कीं चोरी करावी; कोणी देखील असें सांगणार नाहीं कीं ब्रह्मचर्य पाळूं नये. तसेंच असें देखील कोणी म्हणणार नाहीं कीं लोभ करण्यांत—असंतोष ठेवण्यांत धर्म आहे. ज्याप्रमाणें या चार बाबतींत कोणीही मनुष्य धर्म म्हणून म्हणणार नाहीं, त्याच प्रमाणें हिंसा करणें हा धर्म आहे असें देखील कोणीही म्हणणार नाहीं. अर्थात् सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि संतोष या चारींना ज्याप्रमाणें एक मतानें सर्व लोक धर्म म्हणून मानतात अथवा धर्माच्या नांवानें ओळखतात त्याचप्रमाणें 'अहिंसा'—'दया' हा देखील मनुष्याचा नैसर्गिक धर्म आहे. एवढ्यासाठीच तर तटस्थ आणि तत्ववेत्ते यांचे असें म्हणणें आहे कीं:—

" पञ्चैतानि पवित्राणि सर्वेषां धर्मचारिणाम् ।
अहिंसा सत्यमस्तेय त्यागो मैथुनवर्जनम् " ॥ १ ॥

अर्थात्—अहिंसा, सत्य, अस्तेय, त्याग, आणि मैथुनवर्जन

( ब्रह्मचर्य पालन ) या पांचांना प्रत्येक धार्मिकानें आणि प्रत्येक दर्शनकारानें पवित्र मानलें आहे.

याचें हेंच कारण आहे कीं हे पांचही मनुष्याचे नैसर्गिक धर्म होत. या नैसर्गिक धर्मांत देखील ( विशेषें करून अहिंसा धर्मांत ) बराच फेरफार झालेला पाहण्यांत येत आहे. ज्या हिंसेला दरेक मनुष्यानें ' अधर्म ' म्हणून समजावयाचें त्याच ' हिंसेला ' बरीचशी मनुष्यें ' धर्म ' या नांवाखालीं ओळखविण्याला थोडी देखील भीति बाळगीत नाहींत; इतकेंच नव्हे परंतु 'हिंसा करावी, पशुवध करावा' अशी शास्त्रांची आज्ञा आहे असें जाहीर करण्याला देखील ते चुकत नाहींत! थोडी विचार करण्यासारखी गोष्ट आहे कीं, जीं शास्त्रें मोठमोठ्यांच्या गर्जना करून ' अहिंसा धर्माची ' पुष्टी करतात, जीं शास्त्रें 'न हिंस्यात् सर्वा भूतानि' इत्यादि उद्घोषणा करितात, आणि जीं शास्त्रें जगांतील सर्व प्राण्यांना आपल्या आत्म्या प्रमाणें बचावें असें फर्मावितात, तीं शास्त्रें कोणत्याही काळीं ' जीव हिंसा ' हा धर्म आहे असें कधीं तरी सांगतील काय! जीव हिंसा हा धर्म आहे असें तीं शास्त्रें केव्हांही सांगणार नाहींत. इतकेंच नव्हे पण जीव हिंसेला अनुकूल असें एखादें प्रमाण त्या शास्त्रांतून निघणार नाहीं. यदा कदाचित कोठें तरी वचन आढळलें तर तें शास्त्रांशी परस्पर विरुद्धता असल्यानें त्या वचनाच्या सत्यासत्यतें विषयीं संशय न वाटणें, साहजिक आहे. अस्तु. या बाबतींत विशेष पाल्हाळ न लावतां आपणाला आतां या गोष्टींवर आलें पाहिजे कीं, मनुष्याचा नैसर्गिक धर्म, ' अहिंसा ' असून देखील किंबहुना मनुष्यें बलिदानाच्या निमित्तानें, यज्ञाच्या निमित्तानें, शिकारीच्या निमित्तानें, मांसाहाराच्या निमित्तानें आणि अशाच किरकोळ दुसऱ्या निमित्तानें जी ' जीवहिंसा ' करितात ती योग्य आहे कीं काय? व या बाबतींत शास्त्रीय सिद्धांत व युक्ती मनें हत्येची सूचना देतात कीं काय!

## बलिदान म्हणजे काय ?

संसारांत हिंसा अनेक प्रकारांनीं होते. त्यांत पुष्कळशी माणसें धर्माचें निमित्त पुढें करून हिंसा करतांना दृष्टीला पडतात. त्या सर्वांत पहिल्यानें आपण बलिदान आणि यज्ञ यांच्या कडे लक्ष देऊं. हिंदु धर्म शास्त्रांत बलिदानाचें विधान ठिकठिकाणीं करण्यांत आलेलें आहे. परंतु वास्तविक बलिदान म्हणजे काय किंवा बलिदान म्हणतात तरी कशाला आणि तें करावें तरी कसें या गोष्टीकडे लोक फारच थोडें लक्ष पुरवितात. व आपल्या जि हेंद्रियाची लोलुपता पूर्ण करण्या साठीं देवादिकांची व शक्तींचीं नांवें पुढें करून बलिदानाच्या नांवा खालीं बिचाऱ्या निर्दोष प्राण्यांची हत्या करतात. खरोखर पाहिलें तर बलिदान म्हणजे काय ? ' देवोद्देशेन यथाविधिपूजोपहारत्यागो बलिः ' देवाच्या निमित्तानें विधिपूर्वक पूजेच्या वस्तूंचा त्याग हाच ' बलि ' शब्दाचा साधा आणि सरळ अर्थ आहे. अर्थात् भक्तजनाकडून मातेच्या अथवा भगवंताच्या प्रेमासाठीं ज्या सर्व प्रकारच्या पूजा साहित्याची आपण प्रभु चरणी भेट ठेवितों अर्थात् भगवंताच्या पूजे साठीं आपण जे पूजा साहित्य आणतों व भगवत चरणीं अर्पण करितों त्यांचेंच नांव ' बलिदान ' हें होय. या वरून आपणाला असें दिसून येईल कीं, बलिदानाच्या सरळ आणि सामान्य व्याख्येंत पशुद्वारा बलिदान करण्याचें, कोणत्याही तऱ्हेनें सांगितलेलें नाहीं. भक्तिपूर्वक व यथाविधि कोणतीही वस्तु ( प्राणी नव्हे ) देव–देवी यांच्या समोर ठेवावी व त्याना समर्पण करावी याचें नांव ' बलिदान '. बलिदानाच्या फळाचा आधार मनुष्याच्या भक्तीवर अवलंबून असतो. एक मनुष्य भक्तिभावनें यावून सर्व साम्राज्य समर्पण करील, आणि दुसरा एखादी क्षुद्रक व थोड्या अगदी किंमतीची साधारण वस्तुच अंतःकरणांतील केवळ शुद्ध भक्तीभावानें अर्पण करील, तर त्यात लाभाचा अथवा फळाचा

अधिकारी दुसरा मनुष्य आहे. कारण त्याची वस्तु अल्प मोलाची खरी पण ती त्यानें केवळ विशुद्ध भक्तीनें अर्पण केली होती. भक्तीरहित, वाटेल तेवढ्या नैवेद्यानें देखील देव–देवी संतुष्ट होत नाहींत. म्हणून आपण खास लक्षांत ठेवलें पाहिजे कीं भक्ति हेंच उपासनेचें मूळ कारण आहे. अशा प्रकारच्या विशुद्ध भक्तीनें जी माणसे भगवंताची उपासना अथवा देवीची उपासना करतात ती कधीं देखील, निरपराधी आणि देवी–देवादिकांच्या जवळ आपल्या इतक्याच अधिकारसंपन्न व निर्दोष प्राण्यांचा, वध करणारच नाहींत. निर्दोष प्राण्यांचा वध, त्यांची निर्दयता, अभक्ति, आणि जिव्हेंद्रियाची लोलुपता स्पष्टपणें जाहीर करते.

या प्रसंगीं हें देखील एक विचार करण्या सारखें आहे कीं जी माणसें बलिदान करतात ती तें देव–देवींच्या प्रसन्नते साठींच करतात. त्यांची अशी इच्छा असते कीं आपली कार्यसिद्धि होईल. परंतु ही त्यांची समजूत अथवा ही त्यांची मान्यता कितपत सत्य आहे याचा आपण आतां थोडासा विचार करूं.

देवी ही जगांतील सर्व प्राण्यांची माता आहे. तिचें प्रेम आपल्या सर्व संताना ( जगांतील सर्व प्राणीमात्रा ) वर एक सारखेंच असतें; उलट नैसर्गिक नियमाप्रमाणें मनुष्य प्राण्यापेक्षां पश्वादिकां वर थोडेंसें जास्तच प्रेम असणें साहजिक आहे. कारण पश्वादिक मनुष्यापेक्षां लहान आहेत आणि आईची लहान लेकरांवर जास्त ममता असते अशा परिस्थितींत त्याच तिच्या लाडक्या लेकरांना तिच्याच वडील पुत्रांनीं तिच्या समक्ष घेऊन जाऊन तिच्याच नांवानें त्याचा वध करावा हें एकप्रकारें केवः [illegible], निर्दय आणि क्रूरतेचें कृत्य आहे ! याचा बुद्धिमान मनुष्याला सहज विचार करतां येण्या सारखा आहे. [illegible] आई समक्ष तिच्या लेकरांना नेऊन त्यांचा वध केल्यानें

आई खरोखर कधींही प्रसन्न होऊं शकेल काय? आणि पुत्रांच्या वधानें माता प्रसन्न होईल अथवा होत असेल तर तिला माता—आई—असें खरोखर म्हणतां तरी येईल काय ? खरोखर पाहिलें तर मांस लोलुप मनुष्ये पशुवध करून मातेची अप्रसन्नताच मिळवितात; व त्याच भयंकर पापाचें हें परिणाम आलें आहे कीं जिकडे तिकडे कॉलेरा, प्लेग, इनफ्ल्यु-एन्झा वगैरे रोगांनीं धुमाकूळ माजवून दिला असून जिकडे तिकडे मृत्युची संख्या भयंकर प्रमाणांत वाढली आहे. मृत्यू आपला काळदंड घेऊन या पृथ्वीवर दत्त म्हणून उभा आहे ! प्राणीवधाच्या अशा निंद्य आणि क्रूरतेच्या कार्याला बघून माता कोठवर धीर धरूं शकेल ?

## मातेचे नवस.

पुष्कळ वेळा कित्येक अज्ञान मनुष्ये आपला मुलगा आजारी पडला असला तर असा नवस करितात कीं "हे जगदंबे ! माझा मुलगा बरा झाला कीं मी तुझ्या नांवानें एक बकरा देईन." समजा कीं आ-युष्याच्या प्रबलतेनें कदाचित मुलगा बरा झाला. तर तो काय समजतो कीं मातेनें माझा मुलगा बरा केला. आणि याच खोट्या श्रद्धेनें तो माते पाशीं जाऊन आपला नवस फेडतो व एका निर्दोष बकऱ्याला क्रूरतेनें मारून त्याचा प्राण घेतो. अशा तऱ्हेचे नवस करणारांनीं थो-डासा विचार करावयाला पाहिजे कीं जर नवस केल्यानें—एका निर्दोष बकऱ्याचा प्राण घेतल्यानें—माता मनुष्याचें आयुष्य वाढविल तर मग या दुनियेंत कोणी देखील मरणार नाहीं. आतां येथें आम्ही असें विचारण्याची परवानगी घेऊं कीं नवस केल्यावर कोणी मेला नाहीं काय ! अथवा नवस केल्यानंतर कोणीं मरत नाहीं काय ? आम्हाला माहीत आहे कीं हजारो मनुष्ये मेली आहेत व हजारो मरतही आहेत. तर मग मनुष्याला जिवंत ठेवण्याला नवस कशा तऱ्हेनें कारणीभूत होऊं शकतात ? या वरून आपण

साहजिक मग्ग निर्णयावर येतो कीं दोन्ही प्रकारांनीं नवस हे निरर्थक आहेत. सारांश काय कीं रोगी मनुष्याचें आयुष्य शिल्लक असनें तर तुम्ही नवस केला तरी तो वांचणार व न केला तरी तो वांचणारच, आणि रोगी मनुष्याचें आयुष्य शिल्लक नसलें तर शेंकडों अथवा हजारो नवस केले तरी तो मरणारच. अतएव नवस करणें हें दोन्ही दृष्ट्या निरर्थक आहे..

वर प्रमाणेंच कित्येक पुत्र प्राप्ती करितां देखील असा नवस करतात कीं:—" मला पुत्र होईल तर देवी तुला मी एक बकरा अर्पण करीन." हा देखील मातेला फसविण्याचाच धंदा नव्हे काय ! व याला ठगबाजी शिवाय दुसरें म्हणावें तरी काय ! हें तर असें झालें कीं:—

" माता पासे बेटा मांगे कर बकरेका साटा ।
अपना पूत खिलावन चाहे पूत दूजेका काटा " ॥

बकऱ्याच्या बदल्यांत पुत्र मागावा आणि दुसऱ्याच्या पोराला—बकरीच्या पोराला—कापून आपल्याला पुत्रप्राप्ति व्हावी अशी इच्छा करणें, तसेंच बकऱ्याचा नवस करून आपला आजारी पुत्र बरा व्हावा अशी इच्छा करणें, याच्या तोडीची अनीति—अधर्म—अन्याय या दुनियेंत असूं शकेल काय ! परंतु खरें हेंच आहे कीं स्वार्थानें अंध झालेली माणसें न्याय—अन्याय, धर्म—अधर्म, नीति—अनीति यांच्याकडे मुळीं बघतच नाहींत. त्यांची नजर फक्त स्वार्थसिद्धी वरच असते.

### मातेची पूजा कशी करावी ?

खरें पाहूं गेलें तर आपणाला असेंच दिसून येईल कीं सत्वगुण संपन्न मनुष्ये शुभ भावनेनेंच देव—देवींची पूजा करितात. ते कोणत्याही काळीं देखील आपल्या स्वतःच्या इष्ट लाभासाठीं दुसऱ्यांचें अनिष्ट

चिंतन करीत नाहींत. त्यांच्या भावना नेहमीं प्राणीमात्रांच्या कल्याणाच्याच असतात. क्लेश देणें तर दूरच राहिलें, पण दुसऱ्यांना क्लेश देण्याची इच्छा देखील सत्वगुणसंपन्न मनुष्ये करीत नाहींत आणि तेवढ्या साठींच श्रुति मोठमोठ्यानें सांगत आहेत कीं:—" **मा हिंस्यात् सर्वा भूतानि** " कोणत्याही प्राण्याची हिंसा करूं नका.

या श्रुतींतील महावाक्याला नित्य स्मरणांत ठेऊन सत्वगुणसंपन्न पुरुषांनीं देवी पूजा वगैरे कार्यें केलीं पाहिजेत. अर्थात् पूजा करणें मनुष्याचें कर्तव्य आहे परंतु पूजा अशी नको आहे किंवा अशी नसावी कीं जी करण्यानें दुसऱ्या निर्दोष प्राण्यांच्या जीवांचा संहार केला जावा ! कदाचित् कोणी असें म्हणेल कीं ' **दुर्गासप्तशती** ' मध्यें ' **पशु पुष्पैश्च गन्धैश्च** ', पशु, पुष्प आणि सुगंधित पदार्थांनीं देवीची पूजा करण्याविषयीं सांगितलें आहे तर त्याचें कसें ? याचें हेंच उत्तर आहे कीं—जशी पुष्पपूजा, ( पुष्पपांकळ्या निरनिराळ्या काढून नव्हे तर सबंधच्या सबंधच पुष्प ) देवीच्या मस्तकावर, शरीरावर, आणि पदकमलावर ठेवून करितात व त्याचा कोणताही भाग खंडीत करीत नाहींत, तशीच अथवा त्याच प्रकारानें पशुला ही अखंडित अर्पण करून देवीची पूजा केली पाहिजे. अर्थात् पशुला माते समोर उभा करून अशा प्रार्थनायुक्त भावनेनें सोडून दिलें पाहिजे कीं:—"हे जगदंबे ! आपल्या दर्शनलाभानें ज्याप्रमाणें आम्ही निर्भयपणानें जगांत वावरतों, त्याच प्रमाणें आपल्या दर्शनानें पुनीत झालेला हा बकरा देखील या दुनियेंत निर्भयपणें वावरो. अर्थात् कोणी देखील मांसाहारी त्याचा वध न करो." अशा संकल्पानें खरोखर त्या बकऱ्याला सोडून दिलें पाहिजे. अशा करण्यानेंच पुण्य होतें व माता देखील प्रसन्न होते. वास्तविक हाच पूजेचा खरा विधि आहे.

आतां ज्या हिंदुधर्मशास्त्राचा आधार घेऊन पुष्कळसे लोक बलिदानाच्या निमित्तानें पशुहिंसेची प्रवृत्ति करतात, त्याच हिंदुशास्त्रांत ठिकठिकाणीं हिंसेचा निषेध केल्यांचीं वचनें, तसेंच हिंसा केल्यानें मनुष्याची झालेली दुर्गति या बाबतींत अनेक दृष्टांत आढळतात. त्याच्याकडे आपण वळूं.

## सुरथ राजाचा दृष्टान्त.

सप्तशतीच्या शेवटील अध्यायावरून असें दिसुन येतें कीं;—**सुरथ राजानें** राज्यप्राप्तीच्या इच्छेनें देवीची जी आराधना केली होती त्यांत देखील पशु हत्येचें नांव नाहीं. सुरथ आणि समाधि नांवाचा वैश्य या दोघाजणांनीं नदीतीरीं देवीची मूर्ति बनवून पुष्प, धूप, होम आणि तर्पणादि द्वारा देवीची पूजा केली होती. ते निराहार करीत असत. एखाद्यावेळीं फलादिकांचा अल्पाहार करीत. या प्रमाणें तीन वर्षें पावेतों देवीच्या भक्तींत तल्लीन राहून आणि इंद्रियांचें दमन करुन त्यांनीं देवीची उपासना केली होती. परंतु त्यांनीं पशु हिंसा बिल्कुल केली नव्हती. शेवटीं देवी प्रसन्न झाली आणि तिनें त्यांना वरदान दिलें. याचप्रमाणें देवी भागवताच्या भागवताच्या पांचव्या स्कंधांतील पंधराव्या अध्यायांत देखील असेंच सांगितलें आहे कीं सुरथ राजा आणि समाधि वैश्य यांना पूजेचा अधिकार आहे. तथापि त्यांत देखील त्यांनीं पशूंचा बळी देऊन पूजा केली होती असें कोठेंही लिहिलेलें आढळत नाहीं. अशी खरी स्थिति असून देखील कित्येकांकडून सुरथ राजाच्या कपाळीं असा आरोप लादण्यांत येतो कीं 'त्यानें पशुहत्या केली होती. कदाचित् ही गोष्ट जर खरी मानण्यांत आली, तर त्याच. बरोबर **ऊर्द्ध्वाम्नायसंहिते** *मध्यें सुरथ राजाला जें फळ मिळालें असें लिहलें आहे,* तें देखील सत्य आहे असेंच मानलें पाहिजे. **ऊर्द्ध्वाम्नायसंहिते** मध्यें खालील वचन आहे —

"छागं यो हन्ति तं हन्ति छागो भूत्वा च खड्गभृत्।
सुरथं परलोके ही पशवो जघ्नुरित्युत" ॥

जो मनुष्य बकऱ्याचा नाश करितो, त्या मनुष्याचें, पुनर्जन्मांत बकरा खड्ग धारण करुन हनन करितो. सुरथराजानें ज्या पशूंचा बलि दिला त्या पशूंनीं परलोकीं सुरथराजाचें हनन केलें होतें. सारांश कीं सुरथ राजानें पूर्जेत जरी पशुहिंसा केली नव्हती. परंतु कदाचित आपण असेंही धरुन चाललों कीं त्यानें पशुहिंसा केली होती तरी पशुहत्येचें भयंकर फळ त्या बरोबरच दाखविलें असल्यामुळें पशुहिंसा करूं नये हाच सर्वमान्य सिद्धांत ठरतो.

## वसु राजाचा दृष्टान्त.

याचप्रमाणें वसु राजाचाही दृष्टान्त प्रसिद्ध आहे. एका वेळीं देवता आणि ऋषि यांचा आपसांत वादविवाद झाला कीं 'अज' या शब्दाचा अर्थ 'बकरा' करावा कीं 'धान्य'? अर्थात् देवता 'बकरा' असा अर्थ करावा असें म्हणत होते, व त्यावेळीं ऋषींचे मत 'धान्य' अर्थ आहे असें होतें. या बाबतींत निर्णय करण्याचें काम वसु राजाकडे सोंपविण्यांत आलें. तेव्हां वसु राजानें प्रथम हेंच विचारलें कीं या बाबतींत कोणाचें काय मत आहे? त्या वेळीं ऋषींनीं सांगितलें कीं 'अज' या शब्दाचा अर्थ देव 'बकरा' असा करीत आहेत आणि आम्हीं त्याचा अर्थ धान्य असा करितों. त्यानंतर वसु राजानें देवतांचा पक्ष धरुन निकाल दिला कीं 'अज' शब्दाचा अर्थ 'बकरा' हाच करणें श्रेयस्कर आहे. हें असत्य आणि पक्षपातीपणाचें वचन ऐकून ऋषींना फार वाईट वाटलें. त्यांना राजाचा राग आला आणि त्या भरांत त्यांनीं वसु राजाला शाप दिला कीं या पक्षपाती व असत्य वचनामुळें तूं नरकाला जाशील. या ऋषींच्या शापामुळें वसु राजा नरकांत पडला.

( ही कथा, महाभारत शान्तिपर्व मोक्षाधिकाराचा अध्याय २३९ पृ. २४३ यांत सांगितली आहे. )

## 'सत्य' ब्राह्मणाचा दृष्टान्त.

अशाच प्रकारची दुसरीही एक कथा आहे. एके वेळीं युधिष्ठिर राजानें भीष्म पितामह यांना विचारलें कीं :–

" बहूनां यज्ञतपसामेकार्थानां पितामह ! ।
धर्मार्थं न सुखार्थार्थं कथं यज्ञः समाहितः ? " ॥ १ ॥

अर्थात्–हे पितामह ! पुष्कळ प्रकारचे यज्ञ आणि तप या पैकीं जो यज्ञ सुख आणि धन अथवा संपत्ति साठीं नाहीं, परंतु केवळ धर्मा-साठींच करण्याचें सांगितले आहे, तो कशा तऱ्हेचा असतो ? "

याचें उत्तर म्हणून भीष्म पितामह सांगतातः–पहिला यज्ञ कर-ण्यासाठीं उंछवृत्ति ब्राह्मणाचा जो वृत्तांत आहे, तो नारदमुनींनीं सांगितला आहे. त्या विषयाचा प्राचीन इतिहास मी तुला सांगतों. धर्माच्या बाब-तींत पुष्कळ प्रगति झाली आहे अशा श्रेष्ठ विदर्भ देशांत एक ब्राह्मण राहात होता. तो धान्याचे कण टिपून आणून आपला निर्वाह करीत असे; आणि त्या वरूनच तो उंछवृत्ति या नांवानें प्रख्यात झाला होता. या ब्राह्मणानें एक वेळा यज्ञ करण्याचा विचार केला. नंतर वनांत जाऊन त्यानें जेवणासाठीं वऱ्यांचे तांदूळ ( सामो–गुजराती नांव, एक प्रकारचें धान्य ) व कडू आणि रस रहित परंतु तापाच्या योगानें कांहींशी गोड झालेली ' सूर्यपर्णी ' आणि ' सुवर्चला ' नांवाच्या वनस्पतीची भाजी आणिली याच वस्तूंच्या द्वारें त्यानें प्राणिहिंसा होऊं नये आणि स्वर्गप्राप्ती तर व्हावी अशा रीतीचा यज्ञ पूर्ण केला. व त्यांत त्याला सिद्धि प्राप्त झाली. या ब्राह्मणाला ' पुष्करधारीणी ' नावाची एक स्त्री होती व ती

मतें वैकल्यें करून कृश झालेली आणि पवित्र होती. जरी ही स्त्री प्रत्येक बाबतींत पतीच्या आज्ञे प्रमाणें वागत होती तरी अहिंसा यज्ञ करण्याच्या बाबतींत ती पतीच्या विचाराला संमत नव्हती. पण ' स्वामी शाप देतील ' या भीतीनें ती पतीचें अनुवर्तनच करीत होती. ही स्त्री मोरांच्या गळून पडलेल्या पिसांचीं वस्त्रें परिधान करीत होती. तिनें एक वेळा आपल्या स्वामीच्या आज्ञेनें यज्ञाच्या फलाची अपेक्षा न करितां एक यज्ञ करण्याला सुरुवात केली. इकडे ' उंछवृत्ति ' ब्राह्मण जो वनांत राहत असे त्याच्या जवळ एक मनोहर मृग होता. हा मृग ब्राह्मणापाशीं जाऊन त्याला म्हणाला कीं:-" अरे तूं हें काय दुष्कृत्य करित आहेस ? कारण मंत्रांच्या अंगभूत पशूंचा होम केल्याशिवाय तूं यज्ञ करीत आहेस हें योग्य नाहीं. अर्थात् मला अग्नींत होमून ( हवन करून ) आपल्या यज्ञाची तूं पूर्णता करून घे व स्वर्गांत जा." त्या नंतर सूर्यमंडळाची अधिष्टात्री देवी ही प्रत्यक्ष रूपानें त्याच्या जवळ आली आणि म्हणाली कीं:-" माझ्यासाठीं या पशूंचें तूं यज्ञांत हवन केलें पाहिजे. " तेव्हां ब्राह्मण दृढतापूर्वक म्हणाला कीं:-" मी पशुंचा वध करणार नाहीं. कारण हरिण याच वनांत राहत असुन तो माझा शेजारी आहे. आणि शेजाऱ्याचा प्राण घेणें हें मोठें पाप आहे. " ब्राह्मणाचें वचन ऐकून 'यज्ञांत दुश्चरित काय आहे'. ? हेंच जणु काय बघण्याला जात असावी त्या प्रमाणें देवी रसातळ बघण्याच्या हेतूनें यज्ञांतील अग्नींत प्रवेश करून अंतर्धान पावली. देवी अंतर्धान पावल्या नंतर हरिणानें हात जोडून ब्राह्मणाची पुनः प्रार्थना केली कीं-"तूं माझें यज्ञांत हवन कर. " तेव्हां ब्राह्मणानें हरिणाला आलिंगन देऊन म्हटलें कीं:-" तूं येथून निघून जा." हरिण आठ पाऊलें जाऊन पुनः परत आला, व म्हणाला-" हे सत्य, ( ' सत्य ' हें या ब्राह्मणाचें मूळचें नाव होतें ) तूं माझा वध कर. यज्ञांत माझा वध झाल्यानें मला

सद्‌गति मिळेल. मी तुला दिव्य नेत्र देत आहे. त्या दिव्य नेत्रांनीं तूं दिव्य अप्सरा आणि गंधर्वादिकांची विचित्र विमानें पहा. " ब्राह्मणानें बराच वेळ पावेतों दिव्य अप्सरा व गंधर्वादिकांची विमानें पाहिलीं. हें पाहिल्यामुळें स्वर्गांतील वैभवा विषयीं त्याच्या मनांत लालूच उत्पन्न झाली व त्यानें जवळ असलेल्या मृगाचा वध करून, स्वर्ग प्राप्ति करून घेण्याचा विचार केला. परंतु तो मृग साधारण मृगा सारखा नव्हता. हा तर प्रत्यक्ष ' धर्मच ' कांहीं कारणामुळें मृगाचें रूप धारण करून पुष्कळ वर्षांपासुन या अरण्यांत राहत होता. त्यानें याप्रमाणें यज्ञांत देह समर्पण करुन आपली मुक्तता करून घेतली. **परंतु हा कांहीं यज्ञाचा खरा आणि उत्तम विधि नाहीं. कारण या विधींत हिंसा झाली आहे. या प्रमाणें अनिच्छापूर्वक पण स्वर्गाच्या लालसेनें अर्थात् हिंसात्मक यज्ञ केल्यानें सत्य ब्राह्मणाच्या मोठ्या तपाचा नाश झाला.** तेव्हां हिंसा करावी हें कर्म यज्ञीय नाहीं. तदनंतर भगवान धर्मानें त्याच्याकडून यज्ञ करविला, व त्या मुळें त्याच्या स्त्रीचें देखील समाधान झालें कीं हिंसात्मक यज्ञ श्रेष्ठ नाहीं तेव्हां—

" अहिंसा सकलो धर्मो हिंसाधर्मस्तथाविधः ।
सत्यं तेऽहं प्रवक्ष्यामि यो धर्मः सत्यवादिनाम् " ॥२०॥

अर्थात्—' अहिंसा ' हाच समस्त धर्म आहे आणि ' हिंसा धर्म ' तर वरील कथेंत सांगितला आहे तसा—तपाचा नाश करणारा—आहे. सत्य वादि यांचा जो धर्म आहे तोच मी तुला खरोखर सांगतों आहे. "

( महाभारत शान्तिपर्व मोक्षधर्माधिकार अध्याय ९९ पहा. )

वरील दृष्टांतावरून आपणाला सहज कळून येईल की—यज्ञाच्या निमित्तानें किंवा दुसऱ्या कोणत्याही निमित्तानें पशुवध करणें, हें आत्म्याला एक रीतीनें नुकसान पोहोंचविणारेंच आहे; व ही गोष्ट

देखील खरी आहे कीं—दुसऱ्या जीवाला दुःख देऊन धर्म करणें अथवा आपल्या स्वतःच्या सुखाची इच्छा करणें हे शक्यच कसें असणार ? जसें आपल्याला सुख प्रिय आहे, आणि आपण जशी जिवंत राहण्याची इच्छा करितों त्याच प्रमाणें जगांतील सर्व प्राणी सुखी आणि जिवंत राहण्याची इच्छा करितात, 'सव्वे जीवावि इच्छंति जीविउं न मरिज्जिउं' प्रत्येक जीव जिवंत राहण्याला इच्छितो मरण्याला कोणीही इच्छित नाहीं. अशा स्थितींत अनाथ, अशरण, व आपलें दुःख कोणालाही सांगूं शकत नाहींत अशा बिचाऱ्या दीन पशूंचा संहार करणें हें केवढें मोठें अनुचित आणि निंदनीय तसेंच पापमूलक कर्म आहे याचा मनुष्यमात्रांना विचार करतां येण्या सारखा आहे.

## काय ? यज्ञांत हवन केलेले पशु स्वर्गांत जातात ?

कित्येक मनुष्ये आपली स्वतःची इच्छा पूर्ण करण्यासाठीं एथ पावेतों यत्नें आणि प्रमाणें दाखवितात कीं:—" यज्ञांत ज्या पशूंचा होम केला जातो त्या पशूंचा स्वर्गांत वास होतो—अथवा ते पशु स्वर्ग लोकाप्रत जातात. " या वचनाचा कोणीही बुद्धिमान पुरुष स्वीकार तरी करूं शकेल काय ? व जर हें वचन सत्यच असेल तर एका कवीची खालील उक्ति देखील उजेडांत आपण कां आणू नये ?

" नाहं स्वर्गफलोपभोगतृषितो नाभ्यर्थितस्त्वं मया
संतुष्टस्तृणभक्षणेन सततं साधो ! न युक्तं तव ।
स्वर्गे यान्ति यदि त्वया विनिहता यज्ञे ध्रुवं प्राणिनो
यज्ञं किं न करोषि मातृपितृभिः पुत्रैस्तथा बांधवैः" ॥१॥

एक कवि यज्ञांत हवन केल्या जाणाऱ्या पशूंची कड घेऊन पशूं-च्या बाजूनें असें म्हणतो कीं:—मी स्वर्ग फळाच्या उपभोगाचा अथवा

स्वर्गाच्या प्राप्ति साठीं तृषित नाहीं, व तुम्हाला मीं तशी प्रार्थना देखील केली नाहीं कीं—माझें यज्ञांत हवन करून मला स्वर्गांत पोहोंचवा. मी तृण—गवत—खाऊनच जिवंत राहण्यांत संतुष्ट आहें, तेव्हां हे सज्जन पुरुषा! तुला हें कार्य करणें (यज्ञांत माझें हवन करणें) उचित नाहीं आणि यदा कदाचित तुझ्या हातुन होत असलेल्या यज्ञांत हवन केले जाणारे प्राणी स्वर्गांतच जातात तर मग, सर्वांत अधिक प्रिय, पिता, पुत्र आणि बंधु यांचें हवन करून यज्ञ कां करण्यांत येत नाहीं? अर्थात् अगोदर या यज्ञांत त्यांचें हवन करून त्यांना स्वर्गांत पोहोंचविणें काय खोटें आहे?

कवीची वरील उक्ति अगदीं बरोबर व सत्य आहे—जर कां यज्ञांत किंवा देवीच्या समोर पशुंचा वध केल्यानें ते पशु स्वर्गांत जातात अथवा स्वर्गांत जात असतील तर त्या पशुंना स्वर्गांत पाठविणारे आपली माता, पिता, पुत्र आणि भाऊ वगैरे आप्तजनांना यज्ञांत हवन करून—काय म्हणून प्रथमत. स्वर्गाला पोहोंचवून देत नाहींत? परंतु वास्तविक तसें मुळींच नाहीं. मांस लोलुप माणसें आपला स्वतःचा बचाव करण्यासाठींच धर्माच्या नांवाखालीं दीन पशुंची हिंसा करितात. आणि आपल्या बाजूचें धर्माच्या पांघरुणाखालीं अशा खोट्या तऱ्हेनें समर्थन करितात.

## काय? पुराण पुरुषांनीं अथवा प्राचीन पुरुषांनीं देवी पूजेंत पशुवध केला होता?

या ठिकाणीं या गोष्टीची आपण थोडी चौकशी करूं कीं, हिंदु धर्मशास्त्रांत, प्रथमतः ज्या ज्या महात्म्यांनीं आणि पूज्य पुरुषांनीं देवीपूजा केली त्यांनीं देवीपूजा करितांना पशुवध केला होता कीं काय? या संबंधांत एकच परंतु अतिशय महत्वाचें प्रमाण घेऊं. ब्रह्मवैवर्त पुराणाच्या प्रकृति खंडाच्या ६६ व्या अध्यायांत म्हटलें आहे कीं:—

"श्रीकृष्ण परमात्म्यानें गोलोकस्थ रासमंडळांत भगवती दुर्गा देवीची पहिल्यांदा पूजा केली होती. मधुकैटभ युद्धांत श्री विष्णूनें दुसऱ्यांदा पूजा केली होती. तिसऱ्यांदा त्याच सुमारास प्राणावर संकट आलें असतां श्री महादेवानें दुर्गादेवीची पूजा केली होती. चौथ्यांदा महा घोरतर त्रिपुरयुद्धकालांत श्री महादेवानें देवीची पूजा केली होती. या शिवाय वृत्रासुराच्या वध कालीं घोर प्राण संकटाची वेळ आली असतां श्री इंद्र आणि देवगणांनीं पांचव्यांदा देवी भगवतीची पूजा केली होती आणि तदनंतर देखील प्रत्येक कल्पांत मुनींद्र मनू आणि सुरथादि मनुष्य हे परंपरेनें देवीची पूजा करीत आले आहेत; परंतु वरील कोणाही देवादिकांनीं किंवा मनुष्यांनीं श्री देवी भगवती मातेच्या कोणत्याही पूजेंत पशुवध केलेला नाहीं."

वरील हकीकत पशुवधाच्या निषेधासाठीं काय कामी प्रमाणभूत आहे ? मनुष्ये ज्यांना देव किंवा महात्मा म्हणून मानतात, त्यांनीं जीं कृत्यें केलीं नाहींत त्या अधर्म कृत्यांना धर्म मानून तीं पापमूलक अधर्म कृत्यें करण्यासाठीं मनुष्यांनीं प्रेरित व्हावें, हें खरोखरच उपहासास्पद कृत्य नव्हे काय? वरील प्रसंगांतच काय? पण रावणाच्या वधप्रसंगी श्रीरामचंद्रप्रभूंनीं देवीभगवतीची पूजा केली होती त्यावेळीं, तसेंच व्रजांगनांनीं केलेल्या श्री देवी कात्यायनीच्या पूजेंत देखील पशुबलीचा कोठेंही उल्लेख केलेला आढळत नाहीं. सारांश "सकाम अथवा निष्काम, कोणत्याही प्रकारच्या देवी पूजेंत पशुवध करणें सर्वथैव अयुक्त आणि अधर्मरूपच आहे." या म्हणण्यांत थोडा देखील अमन्याचा अंश नाहीं. .

### भीष्म पितामहाचें कथन.

या बाबतींत पुष्टि देणारे हिंदु धर्मशास्त्रांतून पुष्कळसे दाखले मिळूं शकतील. जे बाजारानें हिंदू धर्मशास्त्राचें अवलोकन करतात

त्यांना असे अनेक प्रसंग आढळतात कीं त्या प्रसंगांत पशु वधाचा सर्वत्र प्रकारांनीं निषेधच केलेला आहे. तसेंच यज्ञादि कार्यांत होणाऱ्या पशु हिंसेला देखील निंदनीयच गणलेली आहे. शांतिपर्वाच्या २६५व्या अध्यायांत लिहिलें आहे कीं:—

भीष्म उवाच—

"अव्यवस्थितमर्यादैर्विमूढैर्नास्तिकैर्नरैः।
संशयात्मभिरव्यक्तैर्हिंसा समनुवर्णिता ॥ ४ ॥
सर्वकर्म्मस्वहिंसा हि धर्मात्मा मनुरब्रवीत्।
कामकाराद्विहिंसन्ति बहिर्वेद्यान् पशून्नराः ॥ ५ ॥
तस्मात् प्रमाणतः कार्यो धर्मः सूक्ष्मो विजानता।
अहिंसा सर्वभूतेभ्यो धर्मेभ्यो ज्यायसी मता ॥ ६ ॥
यदि यज्ञांश्च वृक्षांश्च यूपांश्चोद्दिश्य मानवः।
वृथा मांसं न खादन्ति नैष धर्म्मः प्रशस्यते ॥ ८ ॥
सुरां मत्स्यान्मधु मांसमासवं कृशरौदनम्।
धूर्त्तैः प्रवर्त्तितं ह्येतन्नैतद्वेदेषु कल्पितम् ॥ ९ ॥
मानान्मोहाच्च लोभाच्च लौल्यमेतत् प्रकल्पितम्।
विष्णुमेवाभिजानन्ति सर्वयज्ञेषु ब्राह्मणाः ॥ १० ॥
पायसैः सुमनोभिश्च तस्यापि यजनं स्मृतम्।
यज्ञियाश्चैव ये वृक्षा वेदेषु परिकल्पिताः ॥ ११ ॥
यच्चापि किञ्चित् कर्त्तव्यमन्यच्चोक्षैः सुसंस्कृतम्।
महत्सत्त्वैः शुद्धभावैः सर्वं देवार्हमेव तत्" ॥ १२ ॥

एके वेळीं श्री भीष्म पीतामह ह्यानीं श्री धर्म राजाला—युधिष्टि-राला—सांगितलें कीं:—"हे धर्मराज! महामूर्ख संशयवान, अव्यक्तसिद्धान्तानुयायी नास्तिकांनीच हिंसात्मक यज्ञाला मानिलें आहे आणि

केवळ मनः पूत वागणारे धनलयानेंच मनुष्य पशुहिंसा करितात; परंतु धर्मपरायण श्री मनूंनीं तर अहिंसेचीच प्रशंसा केलेली आहे. अतएव त्याच प्रमाणाला अनुसरून सूक्ष्म धर्मानुष्ठान करावें हेंच पंडित जनांचें कर्तव्य आहे. सर्व धर्मांत अहिंसाच श्रेष्ठ धर्म आहे. जीं मनुष्ये यज्ञ, वृक्ष, आणि यूप यांचें निमित्त पुढें करुन पशुवध करून विनाकारण मांसाहार करितात अर्थात् यज्ञ, वृक्ष, आणि यूप यांच्या निमित्तानें मांस खातात—त्या शिवाय दुसऱ्या वेळीं किंवा दुसऱ्या निमित्तानें मांसाहार करीत नाहींत—त्यांचें धर्म कृत्य देखील प्रशंसनीय नाहीं. सारांश कीं विधिसहित खाणें हें देखील उचित नाहीं. मद्य, मत्स्य, मधु, मांस तालरस (ताडी-माडी) आणि यवागु या वस्तूंचे ठिकाणीं धूर्त मनुष्येच आसक्त होतात. वेदामध्यें या वस्तूंना भक्षण करण्याचा विधि नाहीं. वस्तुतः मान, मोह आणि लोभ या मुळेंच मनुष्य या वस्तूंच्या ठिकाणीं लोलुपता ठेवतो. वेदज्ञ ब्राह्मण तर सर्व यज्ञामध्यें श्री विष्णूचा आविर्भाव मानतात व म्हणून ते वेदांत दाखविलेल्या यज्ञीय वृक्ष, पुष्प आणि सुस्वाद पायस ( खीर ) द्वाराच श्री विष्णूची आराधना करितात. कारण शुद्ध भाव ठेवणाऱ्या महात्म्यांनीं ज्या ज्या वस्तूंना उत्कृष्ट मानिलें आहे, त्याच वस्तु देवाला अर्पण करण्यांत याव्यात् यांत शंका घेण्याचें कांहींच कारण नाहीं."

श्री भीष्म पितामहांच्या वरील सांगण्यावरुन देखील आपणाला हें स्पष्टपणें कळून येतें कीं:—यज्ञांत कोणत्याही तऱ्हेनें पशुवध करणें अशास्त्रीय आणि अयुक्त, तसेंच जे कोणीही इच्छित नाहीं असें कार्य आहे. अशा तऱ्हेनें आपण तपास केला अथवा बारकाईनें पाहिलें तर श्रीमद् भागवत, विष्णुपुराण, पद्मपुराण, आणि ब्रह्मवैवर्तपुराण वगैरे महापुराणांत ठिकठिकाणीं पशुवधाचा निषेध केलेला आहे असें आढळून येतें.

## पशु वधांत किती जण हिंसक बनतात ?

या पशुवधा विषयीं कोठ पावेतों सांगावें ? पशुवधानें पशूचा वध करणाराच पापाचा भागीदार होतो असें नाहीं परंतु त्याच्या बरोबर दुसरे पुष्कळजण पापाचे वाटेकरी होतात असें सांगितलें आहे —

" उपदेष्टा वधे हन्ता कर्ता धर्ता च विक्रयी ।
उत्सर्गकर्त्ता जीवानां सर्वेषां नरकं भवेत् ॥
मध्यस्थस्य वधायापि प्राणिनां क्रयविक्रये ।
तथा द्रष्टुश्च सूनायां कुम्भीपाको भवेद् ध्रुवम ॥ "

( शब्दकल्पद्रुमधृत—पद्मोत्तरखंड १०४।९ अ )

अर्थात्—पशुवधाच्या कार्यांत सल्ला अथवा उपदेश देणार, हिंसा करणार, जागा दाखविणार, वध करण्याचे वेळीं पशूला धरून ठेवणार, पशूला विकणार, आणि उत्सर्ग करणार या प्रत्येकाचा नरक लोकांत वास होतो, म्हणजे वरील सर्व जण नरकाप्रत जातात या शिवाय हिंसा करण्या साठीं जेव्हा पशूची विक्री होते त्या वेळीं त्या सौद्यातील मध्यस्थ म्हणजे पशू विक्रीच्या वेळेचा दलाल, त्याच प्रमाणें पशूचा वध होत आहे हें बघणारे, हे सर्वजण निश्चये करून 'कुंभीपाक' नावाचे नरकाप्रत पावतात

याच प्रमाणें ब्रह्मवैवर्त पुराणाच्या प्रकृति खंडातील ६९ व्या अध्यायात सांगितलें आहे कीं —

" उत्सर्गकर्त्ता दाता च च्छेत्ता पोष्टा च रक्षकः ।
अग्रपश्चानिबद्धा च सप्तैते वधभागिन. " ॥ ११ ॥

अर्थात्—बलिदानासाठी पशू समर्पण करणार, बलि देणार, छेदन करणार, पशूचे पोषण करणार, पशूचे रक्षण करणार अथवा पशूची

काळजी राखणार आणि बलि छेदनाच्या वेळीं पशूला मागें व पुढें धरून ठेवणार—हे सातही जण पशुवधाच्या कृत्याच्या पापाचे वांटेकरी आहेत.

या वरून आपणाला सहज कळून येईल अथवा आपल्या सहज लक्षात येईल कीं पशूवधाचें कार्य—मग तो पशूवध बलिदानांतील असो किंवा यज्ञांतील असो—हें एक अतिशय घोर पाप कृत्य असलें पाहिजे. जर तें तसें घोर पाप नसतें तर शास्त्रकारांनीं—तसेंच तत्ववेत्यांनीं—एका पशुवधाच्या कृत्याला इतके सर्व पुरुष पापाचे वांटेकरी आहेत असें कशासाठीं ठरविलें असतें ?

## देवी भगवती मातेची उक्ति.

अगदीं याच प्रमाणें पद्मोत्तर खंडांत देखील देवी भगवती मातेचें वचन आपल्याला आढळून येतें:—

" देवयज्ञे पितृश्राद्धे तथा मांगल्यकर्म्मणि ।
तस्यैव नरके वासो यः कुर्याज्जीवघातनम् ॥
मद्व्याजेन पशून् हत्वा यो भक्षेत् सह बन्धुभिः ।
तद्गात्रलोमसंख्याब्दैरसिपत्रवने वसेत् ॥
आत्मपुत्रकलत्रादिप्रसम्पत्तिकुलेच्छया ।
यो दुरात्मा पशून् हन्यात् आत्मादीन् घातयेत् स तु "॥

अर्थात्—देवयज्ञ, पितृश्राद्ध, आणि दुसऱ्या मांगलिक कार्यांत जो मनुष्य जीव हिंसा करतो, तो नरक लोकाप्रत जातो. शिवाय माझें निमित्त पुढें करून पशूंची हिंसा करून जो मनुष्य आपल्या बंधु वर्गासह मांस भक्षण करतो, तो ज्या पशूचा वध केला त्याच्या शरीरावर जितके रोम—केस—असतील तितके वर्ष पावेतों ' असिपत्र ' नांवाच्या नरकाप्रत जातो. तसेंच जो मनुष्य आत्मा, पुत्र, स्त्री, लक्ष्मी आणि आपलें कुळ

यांची इच्छा धारण करून पशूचा वध करतो, तो स्वतःच्याच आत्म्या वगैरेंचा नाश करितो. "

याच ठिकाणीं पुढें एथ पार्वतीं सांगण्यांत आलें आहे कीं:—

" संपत्तौ च विपत्तौ वा परलोकेच्छुकः पुमान्।
कदाचित् प्राणिनो हत्यां न कुर्यात् तत्त्ववित् सुधीः ॥
वधाद् रक्षति यो मर्त्यो जीवान् तत्त्वज्ञधर्मविद् ।
किं पुण्यं तस्य वक्ष्येऽहं ब्रम्हाण्डं स तु रक्षति ॥ "
( १०४।९ अ. )

अर्थात्—तत्वाला जाणणाऱ्या आणि उत्तम लोकाची इच्छा करणाऱ्या पंडित पुरूषानें सुख अथवा दु.ख यापैकीं कोणत्याही वेळीं प्राण्यांची हत्या करूं नये; व धर्माला जाणणारा जो तत्वज्ञ जीवांचें हिंसे पासुन—वधा पासून—रक्षण करितो, त्याच्या पुण्याचें किती वर्णन करावें ! असेंच समजलें पाहिजे कीं तो ब्रह्माण्डाचें रक्षण करितो.

### पार्वतीचें वचन.

आणखी पहा. पद्मोत्तर खंडांत पार्वती देवी पण म्हणतात कीं:—

" स्वयं कामशयो भूत्वा योऽज्ञानेन विमोहितः ।
हन्त्यन्यान् विविधान् जीवान् कृत्वा मन्नाम शंकर !
तद्राज्यवंशसम्पत्तिज्ञातिदारादिसम्पदाम् ।
अचिराद्वै भवेन्नाशो मृतः स नरकं व्रजेत् " ॥
( १०४।१०९ )

अर्थात्—हे शंकर ! आपल्या कर्माच्या फळाची इच्छा करणारा व अज्ञानानें मोह पावलेला जो मनुष्य माझ्या नांवावर विविध जीवांची हिंसा करितो, त्याचें राज्य, वंश, संपत्ति, जाति आणि स्त्री आदि सर्व

संपदा—सर्व ऐश्वर्य थोड्याच काळांत नष्ट होतें; व असा मनुष्य मरणानंतर नरक लोकाप्रत जातो.

हिंसेच्या निषेधा विषयीं कंठरव करून धर्मशास्त्रकार या प्रमाणें सांगत असूनही, अज्ञान मनुष्ये मांसाहाराच्या लालचीनें, धर्माच्या नांवावर, पुजेच्या निमित्तानें पशूचा वध करण्याला कचरत नाहींत व अशीं घोर कृत्यें करण्याला लाजत नाहींत ही केवढी मोठी खेदकारक गोष्ट आहे ? प्राणिहत्या—जीवहिंसा—न करतांना, मनुष्याला उचित, अहिंसा धर्माचें रक्षण करून व ज्याच्या योगानें दुसऱ्या जीवांचेंही कल्याण होईल अशा रीतीनें मातेची पूजा लोक करतील तर तें किती बरें श्रेयस्कर होईल !

## तीन प्रकारच्या पूजा.

हिंदू धर्मशास्त्रांत मातेच्या पूजेचें फारच चांगल्या तऱ्हेनें विधान करण्यांत आलेलं आहे. ब्रह्मवैवर्त पुराणाच्या प्रकृति खंडांत असें लिहिलें आहे कीः—

" सात्विकी राजसी चैव त्रिधा पूजा च तामसी ।
भगवत्याश्च वेदोक्ता चोत्तमा मध्यमाधमा "

मातेच्या सात्विकी, राजसी आणि तामसी अशा तीन प्रकारच्या पूजा वेदांत सांगितल्या आहेत, व त्या अनुक्रमें उत्तम, मध्यम आणि अधम अशा जाणाव्यात.

आतां विचार केला पाहिजे कीं—या तीन्ही प्रकारच्या पूजामध्यें सात्विकी पूजेला उत्तम म्हटलेली आहे. तेव्हां या सात्विकी म्हणजे उत्तम पूजेला सोडून राजसी आणि तामसी पूजांनें आचरण करणार

हा थोडातरी बुद्धिमान् गणला जाईल काय ? आतां सात्विकी पूजा कशा तऱ्हेनें करावी याचा विधि या प्रमाणें सांगितला आहे:—

" सात्त्विकी जपयज्ञाद्यैर्नैवेद्यैश्च निरामिषैः ।
माहात्म्यं भगवत्याश्च पुराणादिषु कीर्त्तितम् ॥
पाठस्तस्य जपः प्रोक्तः पठेद्देवीमनाः प्रिये ।
देवीसूक्तजपश्चैव यज्ञो वह्निषु तर्पणम् " ॥

अर्थात्—**सात्विकी** पूजा जप, होम आणि मांस शिवायच्या नैवेद्य द्वारा होते. त्यांत पुराणादिकांत वर्णन केलेलें देवी महात्म्य याचा पाठ करावा, या पाठाला जप म्हणतात. हा जप देवीच्या चरणकमलीं तन्मय होऊन केला पाहिजे. या प्रमाणें **देवीसूक्ताचा** पाठ करणें त्याचें नांव **जप.** अग्नीमध्यें तुपाची आहुती द्यावी याचें नांव **तर्पण.** या तीन प्रकारच्या पूजेला **सात्त्विकी** पूजा म्हणतात. अशा पूजेला सोडून हिंसात्मक **राजसी** आणि **तामसी** पूजेचें आचरण करावें, हें कोणच्याही काळीं बुद्धिमान पुरुषाला उचित आणि भूषणास्पद आहे असें मानलें जाईल काय ?

## बंगाली विद्वानाचा फटका.

**" याहारा ब्राह्मणेर सत्कुले जन्मियाओ अत्रिसंहितानिर्दिष्ट ' शूद्र , ' निषाद ' ' पशु ' ' म्लेच्छ ' ओ ' चण्डाल-ब्राह्मण ' बलिया परिचय दिते लज्जा बोध करेन ना ( अत्रिसंहिता ३७०-४ ), ताँहारा ये किरातादि निकृष्टजातिर न्याय तामसिक पूजार अनुष्ठान करिबेन, ताहाते आर आश्चर्य कि ? "**

अर्थात्—जे ब्राह्मणाच्या सत्कुलात जन्म घेऊन सुद्धां **अत्रिसंहितेंत** दाखविलेले शूद्र, निषाद, पशु, म्लेंछ आणि चांडाल ब्राह्मण म्हणून आपला स्वतःचा परिचय करून देण्याला लाज वाटत नाहीं" ( अत्रि

संहिता ३७०-४) ते किरातादि निकृष्ट जाती प्रमाणें तामसिक पूजेचें अनुष्ठान करतील यांत आश्चर्य पावण्या जोगें काय आहे ?

बंगाली विद्वानाचें वरील कथन, उत्तर हिंदुस्थान, मिथिला, मगध आणि बंगाल या देशांत जे तामसिक पूजेला—देवी पूजेंत पशुवध करण्याच्या मार्गाला—हटानें धरून बसले आहेत त्या ब्राह्मणांना अधिक लागू पडतें. त्या देशांत नवरात्रि महोत्सवांत देवी समोर पुष्कळ ठिकाणीं इतकी मोठी जीव हिंसा होते कीं हिंसा केलेल्या प्राण्यांच्या रक्तानें कित्येक कुंड भरून जातात. हिंदु लोकांनीं मानलेल्या त्या पवित्र नवसणांच्या दिवसांत—नवरात्रीच्या महोत्सवांत—हजारो नव्हे पण लाखो जीवांचा धर्मांच्या नांवाखालीं संहार केला जातो—होतो; याच प्रमाणें गुजरात काठेवाड आणि राजपुतान्यांत अजून देखील कित्येक ठिकाणीं देवी समोर नवरात्रांत पशुवध होतो, ही अत्यंत खेदकारक गोष्ट आहे ! मुसलमानांच्या बकरी ईदेच्या दिवशीं जीवांना वाचविण्या साठीं जे हिंदु बांधव हजारो रुपये खर्च करण्याला आणि शेवटीं आपला प्राण देखील अर्पण करण्याला तयार होतात तेच हिंदु बांधव आपल्या मानलेल्या देवी समोर जीव हिंसा करतात, वध होत आहे हें पाहतात, अथवा त्याची उपेक्षा करतात, ही केवढी शोचनीय गोष्ट आहे ? बलि **दानेर शास्त्रीय सिद्धान्त** ' नांवाच्या बंगाली पुस्तकांत एके ठिकाणीं लिहिलें आहे तें अगदीं बरोबर आहे कीं:—पूर्व कालांत गोवधाच्या रीतीला अहितकर आणूनच शास्त्रामध्यें गोवधाचा निषेध केला आहे, आणि आतांतर त्या गोवधाला सर्व प्रकारें अधर्मकर मानून देखील धर्मांच्या नांवाखालीं आहारासाठीं जे गोवध करितात त्यांना कित्येक हिंदु दोष देतात, परंतु हिंदुच (कित्येक) कुसंस्काराच्या योगानें आणि भ्रमानें विनाकारण, अत्यंत उपकारी आणि खाण्याला अयोग्य अशा रेड्यांची हत्या करितात तेव्हां ते गोवध करणाऱ्याहून अधिक निंदेला पात्र नाहींत काय ? अशिक्षित आणि इतरया वर्गाचे हिंदु सामान्यतः द्रव्याच्या लालसेनें वृद्ध आणि कमाश

निरूपयोगी अशा बैल, गायी वगैरे पशूंना कसायाला विकतात; ते कृतघ्नता आणि निर्दयता यांचें प्रतिफळ दुर्भिक्ष (दुष्काल) आणि इतर दुसरे होणारे उत्पातादि (कालेरा, प्लेग इन्फ्लुएन्झा वगैरे) संकटे कष्ट याच जन्मांत पावून आपआपल्या पापाचें प्रायःश्चित्त भोगतात. किन्तु पूर्व बंगाल्यांत मुख्य मुख्य ठिकाणीं शिक्षित महानुभाव आणि छोटा-नागपूर वगैरे ठिकाणीं त्यांच्या सारखेच क्षत्रिय हे देवीच्या मातेच्या पूजेच्या निमित्तानें असंख्य रेड्यांनें बलिदान देऊन आपल्या तामसिकपणाचा परिचय करून देतात. राजपुतान्यांत विजया दशमीच्या दिवशीं महिषासुर वधाचें अनुकरण करून भाला आणि तरवारीनें वारंवार भोसकून आणि धार करून अत्यंत निष्ठुरता पूर्वक रेड्यांची हत्या करितात. त्याच आसुरिक अनुष्ठानाच्या विषयाचा थोडा विचार केला असतां असें दिसून येईल कीं धर्माच्या नांवाखालीं, अनेक हिंदु कीं जे हिंसा करणाऱ्या पशू पेक्षांही जास्त वाईट आचरण करणारे आहेत व जे त्याग करण्या योग्य आहेत, त्या प्रत्येक हिंदूला कबूल करावें लागेल कीं धर्माच्या नांवाखालीं होणाऱ्या या महा पापाचें भयंकर प्रायश्चित्त पण आमच्या देशांत प्रत्यक्ष आणि परोक्ष रीतीनें नेहेमीं मिळत असतें.”

वरील विवेचनावरून आपण पाहूं शकूं कीं, हिंदु बांधव जरी गोवध करीत नाहींत तरी पुष्कळ ठिकाणीं, पुष्कळ प्रसंगीं त्यांच्या कडून दुसऱ्या जीवांची हिंसा कांहीं कमी होत नाहीं.

## मुसलमान धर्मशास्त्रांत हिंसेचा निषेध.

अशाच तऱ्हेनें आमचे मुसलमान बंधूही बकरीईद आणि अशाच दुसऱ्या प्रसंगीं गायी, बकरी, मेंढें वगैरे प्राण्यांची जी हिंसा करितात ती देखील खुदाच्या ( ईश्वराच्या ) फर्मानाच्या (आज्ञेच्या) अगदीच विरुद्ध आहे कारण खुदा ( ईश्वर ) हा जगाचा पिता आहे. जगांत जेवढे म्हणून जीव आहेत त्या सर्वांना पिता खुदाच आहे. याचाच

अर्थ जगांतील सर्व जीव ईश्वराचे पुत्र आहेत. आतां खुदा आपल्या पुत्राला मारण्याची आज्ञा कोणत्याही काळीं देणारच नाहीं हें स्पष्ट आहे इतकेंच नव्हे पण स्वपुत्राला जिवे मारण्याची आज्ञा कोणताही कलियुगांतला बाप देखील करणार नाहीं; आणि म्हणूनच तो परमेश्वर (खुदा) अशी आज्ञा देईल हें मानणें देखील शक्य नाहीं. खुदाच्या ठिकाणीं तर मनुष्य काय आणि दुसरे जीव काय सर्व सारखेच आहेत. खुदानें तर मनुष्याला अगदीं पहिलें फर्मान हें केलें आहे कीं:–' **समस्त जीवोंपर रहेम रखो** ' ( सर्व प्राणीमात्रांवर–जीवांवर दया ठेवा ) **कुरानेशरीफ** याच्या सुरुवातींतच अल्लाताला (खुदा) याला **रहीम** हें विशेषण लावण्यांत आलें आहे. ' **बिस्मिल्लाह रहिमान्नुर रहीम** ' हेंच मंगलाचरण आपणाला दाखवितें कीं दरेक प्राणीमात्रांवर–जीवांवर दया ठेवावी. या शिवाय मुसलमान बंधूंच्या धर्मस्थानांत आणि तीर्थ-स्थानाचे ठिकाणीं जीव हिंसेचा समजून उमजूनच निषेध केलेला आहे. **कुराने** शरीफांत सुराउलमायद सिपाराज, मंजल २ आयत ३ मध्यें असें सांगितलें आहे कीं:–" **मक्केमध्यें मक्केच्या हद्दींत कोणी ही जनावर मारूं नये–कोणी ही प्राणिमात्राची हिंसा करूं नये–आणि कोणी चूकून मारिलें, तर त्याच्या बदल्यांत त्यानें आपलें पाळलेलें जनावर मक्केच्या हद्दींत ठेवावें. अथवा दोन शहाणे पुरुष जी किंमत सांगतील तेवढ्या रकमेचें अन्न गरीबाला खाऊं घालावें.** '

इतकेंच नव्हें, परंतु कुरानेशरीफ मध्यें एथ पावेतों सांगण्यांत आलें आहे कीं "मक्का शरीफच्या यात्रेला तुम्ही ज्या दिवसा पासून घरून निघता त्या दिवसा पासून परत फिरे पावेतों रोज 'रोजा' (निराहार ) करा; ( मुसल्मानी धर्मांतील रोजे म्हणजे सबंध दिवसांत कांहीं खावयाचें नाहीं व पाणी देखील प्यावयाचें नाहीं. तारा उगवल्यानंतर मग रोजे सोडावयाचे. तसेंच दिवसा व रात्रीं निरनिराळ्या वेळीं, निमाज

पढावयाचा म्हणजे प्रार्थना करावयाच्या. ) तसेंच जनावरांना मारूं नका व जे खास धार्मिक म्हणून दिवस पाळण्यांत येतात त्या दिवशीं मांस खाऊं नका. "

मक्का हें मुसलमान बंधूंचें सर्वांहून पवित्र तीर्थस्थान मानिलें आहे. जर जीवांचा आहार करणें धर्मकृत्य मानिलें असतें अथवा जीवांच्या आहाराच्या कृत्याची धर्मकृत्यांत गणना केली असती तर मुसलमान बंधूंच्या पूज्य कुरान शरीफांत मक्केंत जीवहिंसा करण्याची कां मनाई करण्यांत आली असती ? अर्थात् या वरून उघड होतें कीं जीवहिंसा करणें हें धर्मकृत्य नाहीं. या हकीकती वरून आपणाला स्पष्ट दिसून येतें कीं मुसलमानांच्या धर्मग्रंथांत देखील पशुवधाचा—जीव हिंसेचा—निषेधच केलेला आहे.

बकरी ईदेच्या दिवशीं जीवहिंसा करूं नये म्हणून कुरान शरीफांतील सुरानहजच्या ३६ व्या आयातांत ही असें सांगितलें आहे कीं:—

" मांस अथवा रक्त हें मला पहोंचणार नाहीं, पण फक्त परहेजगारी ( संयमन च ) मला पोहोंचेल. " अर्थात् मांस आणि रक्त यांनी मी प्रसन्न होणार नाहीं व त्यांनीं तुम्ही मला संतुष्ट ही करूं शकणार नाहीं. पण केवळ संयमनाच्या योगानेंच मी प्रसन्न होईन. अथवा त्याच्या योगानेंच तुम्ही मला संतुष्ट करूं शकाल.

या सारखीं प्रमाणें कोठवर द्यावींत ? ज्या प्रमाणें जैन आणि हिंदुधर्म शास्त्रांत दुसऱ्या जीवांना आपल्या आत्म्या सारखें समजण्या विषयीं सांगितलें आहे 'आत्मवत् सर्वभूतेषु' त्याच प्रमाणें मुसलमान बंधूंच्या धर्मग्रंथांत देखील सांगितलें आहे. त्याच त्यांच्या पवित्र कुरानांतील सुरेआन आममध्यें लिहिलें आहे कीं:—" जे पशू पृथ्वीवर चालतात आणि जे पक्षी आपल्या पंखाच्या सहायानें आका-

शांत उच्चारण करितात ते दुसरे कोणीही नसून तुमच्या प्रमाणेंच जीव आहेत; सारांश कीं त्यानां देखील त्यांचे जीवन तुमच्या जीवा सारखेंच प्रिय आहे. "

हे शब्द देखील आपणाला हेंच दाखवितात कीं, मुसलमान बंधूंना देखील त्यांचें पवित्र कुरान शरीफ सर्व प्राणीमात्रांवर रहेम ( दया ) व आपल्या सारखीच दृष्टि ठेवण्याला फरमाविते.

सुज्ञ आणि चांगल्या तऱ्हेनें धर्मशास्त्र जाणणारे—ज्ञाते—मुसलमान विद्वान यांनां तात्विक दृष्ट्या विचारण्यांत आलें तर ते स्पष्ट सांगतात कीं मुसलमान धर्मग्रंथात जीवहिंसा करावी असें कोणत्याही ठिकाणीं सांगितलें नाहीं. काबूलचे अमीर साहेब एकवेळा हिंदुस्थानांत मुसाफरी करितां आले होते; तेव्हां ईदेचा सण उजविण्या साठीं ते दिल्लीला गेले होते. तेथील मुसलमान लोकांनीं अमीर साहेबांच्या हस्तें कुरबानी करविण्यासाठीं पुष्कळ गायी गोळा केल्या होत्या. मुसलमान लोकांची अशी समजूत होती कीं असें करण्यानें अमीर साहेब आमच्यावर अतिशय प्रसन्न होतील; परंतु मुसलमानांच्या या तयारीची हकीकत जेव्हां अमीर साहेबांच्या कानावर गेली तेव्हां ते म्हणाले:—

" कुरानांत गाईच्या कुरबानीची ( हिंसेची—बलिदानाची ) कोठेंही आज्ञा नाहीं. शिवाय अशा देखील विचारानें आपण गोवध करतां कामा नये कीं हिंदू आपले शेजारी आहेत; व गोवधानें त्यांचें मन दुःखित होतें ! कारण कुरानांत तर स्पष्ट फरमान आहे कीं आपल्या शेजाऱ्या बरोबर मिळून मिसळून रहावें व त्यांचें मन दुखवूं नये. " जेव्हां कुरानांत असा उल्लेख आहे तेव्हां माझ्यानें गोवध कसा करवेल ? कीं ज्या गोवधा बद्दल कुरानांत आज्ञा नाहीं; शिवाय आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांचें मी कसें मन दुखवूं ? व जें कृत्य—शेजाऱ्यांचें मन दुखविणें—कुरानांत अनीशात गर्ग्य आहे तें मी कसें करूं !

शेजाऱ्याचें मन न दुखविण्याची आज्ञा देखील जगांतील सर्व प्राणीमात्रावर प्रेम करण्यालाच सुचविते. 'शेजारी' याचा अर्थ आपल्या घरा नजीक राहणारे अथवा आपल्या गांवचे मनुष्य नव्हे, पण या दुनियेंत उत्पन्न झालेले सर्व प्राणीमात्र हे आपले शेजारीच आहेत; याचें कारण असें आहे कीं, एकाच पृथ्वीच्या सपाटीवर सर्व प्राणी उत्पन्न झाले आहेत व होत आहेत. तेव्हां या पृथ्वीतलावरील कोणत्याही प्राणीमात्राचें मन दुखवूं नये आणि कोणत्याही प्राण्याला कष्ट देऊं नयें हेंच कुराणांतील आज्ञेचें रहस्य आहे.

मुसलमान धर्म ग्रंथांत अशा तऱ्हेनें जीवहिंसेची सर्व प्रकारें मनाई केलेली असूनही मुसलमान बंधू मध्यें जी जीवहिंसेची प्रवृत्ति बघण्यांत येते ती पाहून फारच आश्चर्य व चमत्कार वाटतो !

मुसलमान बंधू, बकरें, मेंढरीं आणि कोठें कोठें उंट वगैरेंची जी कुरबानी करितात त्या कुरबानीच्या मूळ उत्पत्ति विषयीं आपण पाहूं लागलों तर त्या उत्पत्तिमध्यें आपणाला एक औरच ( विशेष ) रहस्य कळून येते. असें सांगतात कीं:—

" इब्राहीम पैगंबर यांच्या ठिकाणीं जेव्हां देवश्रद्धे विषयीं दृढनिश्चय झाला तेव्हां त्याच्या दृढनिश्चयाची कसोटी करण्यासाठीं अथवा त्याच्या दृढनिश्चयाची परीक्षा पाहण्यासाठीं अल्लानें त्याला सांगितलें कीं —" तुझ्या सर्वांत प्रिय वस्तूचें तूं समर्पण कर. " त्या वरून इब्राहीम पैगंबरानें आपल्या एकुलत्याएक पुत्राचा भोग देण्याची तयारी केली, त्यानें आपले डोळे बांधले आणि तो सुरीनें जसा आपल्या लाडक्या मुलाला मारावयाला गेला, तोंच ईश्वराच्या नैसर्गिक लीलेनें पुत्राच्या ठिकाणीं एक मेंढरूं येऊन उभें राहिलें. ( एका फिरस्त्यानें मुलाला तेथून उचलून त्या ठिकाणीं मेंढराला ठेविलें. ) तें मेंढरूं कापलें गेलें. मुलगा वाचला व तदनंतर अल्लानें त्या मेंढराला पण जिवंत केलें. "

या गोष्टी वरून कोणीही मनुष्य असें म्हणावयाला तर नाहींच समर्थ होणार कीं **इब्राहीम पैगंबरानें** आपल्या मुलाऱ्या ऐवजीं मेंढराला मारिलें, व म्हणुन दरेक मुसलमानानें मेंढरांची, बकऱ्यांची अथवा दुसऱ्या इतर प्राण्यांची कुरबानी केलीच पाहिजे. वरील गोष्टी वरून तर असें स्पष्ट दिसून येते कीं, " अल्लानें **इब्राहीम पैगंबराची** मात्र परीक्षा पाहण्यासाठींच वरील प्रकारचा प्रयत्न केला होता. आतां सध्या जे मुसलमान बंधू कुरबानी करतात, त्यांना काय परमेश्वरानें--अल्लानें--जसा **इब्राहीम पैगंबराला** हुकूम केला होता तसा हुकूम केला आहे? जर त्या प्रमाणें हुकूम केला असेल तर मग जसा **इब्राहीम पैगंबर** आपल्या पुत्राची कुरबानी करावयाला तयार झाला होता, तसेंच त्यांनीं स्वतःच्या पुत्राचा वध करण्याला तयार झालें पाहिजे. मग अल्लाची इच्छा असली तर पुत्राला फिरस्ता उचलून नेऊन त्याच्या जागीं मेंढरूं अगर बकरें ठेवील. परंतु त्यांनीं पहिल्यानेंच कशासाठीं बिचाऱ्या निर्दोष, गवतावर जिवंत राहणाऱ्या आणि मनुष्य जातीवर अनंत उपकार करणाऱ्या पशूंची कुरबानी करण्याला तयार झालें पाहिजे?

मुसलमान बंधूंना मान्य हजरतअल्ली साहेब यांनीं देखील असें फर्माविलें आहे कीं--" **तूं पशु-पक्षी यांची कबर आपल्या पोटांत करूं नकोस अर्थात् पशु-पक्षी यांची हिंसा करूं नकोस व मांसाहार करूं नकोस.** "

सुप्रसिद्ध मुसलमान बादशाहा अकबर यानें देखील याच अर्थानें सांगितलें होतें कीं--"**मी माझें पोट दुसऱ्या जीवांचें कबरस्थान करण्याला इच्छित नाहीं.** "

याच प्रमाणें सबुक्तगीन याच्या स्वप्नाची गोष्ट देखील जवळ जवळ सुप्रसिद्धच आहे:--सबुक्तगीन एक साधारण स्थितीचा मुसल-

मान होता. त्याच्या पाशीं धन, दौलत कीं दास–दासी या पैकीं कांहीं देखील न्हवतें परंतु तो दयाळु होता. स्वतः दरिद्री असून तो दुःखितांना शक्य ती सहायता देण्याला नेहमीं तत्पर असे. एक दिवस घोड्यावर बसून तो अरण्यांत फिरावयाला गेला. तेथें त्यानें एक हरिण बालक पाहिलें. हरिण बालकाला त्यानें आपल्या घोड्यावर उचलून घेतलें. या हरिण बालकाची आई–हरिणी–जवळच चरत होती. तिनें पाहिलें कीं आपल्या बालकाला एका माणसानें आपल्या ताब्यांत घेतलें आहे. हरिण जाति मनुष्याला पाहिल्या बरोबर पळावयाची परंतु तसें न करितां यावेळीं ती हरिणी त्या घोड्याच्या मागोमाग हळू हळू चालूं लागली. आपल्या बालकाच्या वियोगानें तिचें तोंड फारच दीन झालें होतें; व तिच्या अंतःकरणांत अतिशय कष्ट होत आहेत असें भासत होतें. सबुक्तगीनानें जेव्हां त्या हरिणीकडे पाहिलें तेव्हां त्याला असें वाटलें कीं या हरिण बालकाला घेतल्यानें हरिणीला अतिशय दुःख झालें आहे. ‘ पशूला वाचा असती तर आपल्या बालका साठीं या हरिणीनें जरूर प्रार्थना केली असती ’ असा विचार करून त्याला त्या हरिणीची दया आली व त्या हरिणीच्या बालकाला त्यानें हळूंच खालीं सोडून दिलें. व स्वतः तेथून दूर गेला. सबुक्तगीन दूर गेल्या बरोबर हरिणी आपल्या बालका जवळ आनंदानें दौडत व उड्या मारीत गेली व त्या आपल्या बालकाचा लडिवाळपणानें प्यार करूं लागली. ही त्या हरिणीची स्थिति पाहून सबुक्तगीनाच्या मनाला आनंद झाला; शिवाय त्याला असेंही वाटलें कीं ती आनंदमग्न हरिणी आतां मला आशीर्वाद देत आहे.

त्याच दिवशीं सबुक्तगीनाला रात्रीं एक स्वप्न पडलें. स्वप्नांत जणूं काय–हजरत महमद स्वतः त्याच्या जवळ येऊन त्याच्याशीं बोलूं लागले कीं:–“ सबुक्तगीन ! तूं आज हरिणीवर आणि तिच्या बालकावर

तशीच त्या हरिणीवर जी दया दाखविलीस त्या भूतदयेनें ईश्वर तुजवर प्रसन्न झाला आहे. अल्लाच्या इच्छेनें तूं राजा होशील व तूं जेव्हां राजा होशील तेव्हां देखील तूं दीन आणि दुःखितांवर अशीच दया करीत जा. असें केल्यानें ईश्वर-अल्ला-तुजवर हमेशा संतुष्ट राहील." पुढें हजरत महमदाच्या सांगण्या प्रमाणें सबुक्तगीन खरोखरच राजा झाला.

वरील सबुक्तगीनाच्या गोष्टी वरून हेंच सार निघतें कीं-मुसलमान बंधूंना देखील प्राणीमात्रांवर दया करावी असेंच फर्मान आहे. तरी देखील मनुष्ये आपल्या स्वतःच्या अज्ञानतेमुळें कुरबानीच्या खोट्या रीत रिवाजाला दृढ धरून बसले आहेत.

## क्राईस्टच्या आज्ञा.

या प्रमाणें हिंदु आणि मुसलमानांच्याच धर्मग्रंथातून नाहीं, पण इसा-मसीहानें देखील आपल्या फर्मानांतील सहाव्या फर्मानांत असेंच सांगितलें आहे कीं:-'कोणत्याही जिवाची-प्राण्याची-हिंसा करू नका.'

एकदां असें ऐकण्यांत आलें होतें कीं —मोस्कोच्या एका मुलींच्या शाळेंत धर्मशास्त्राची परीक्षा घेते वेळीं मास्तरानें आणि धर्मगुरूनें ईश्वराच्या फरमाना विषयीं प्रश्न विचारले. विशेषें करून-सहाव्या फरमाना विषयीं विचारलेल्या प्रश्नांची ( हिंसा करू नये, हें बायबलांतील सहावें फरमान आहे ) उत्तरें दिल्या नंतर धर्मगुरूनें साधारणरीत्या विचारलें कीं —"प्रत्येक गोष्टींत प्रत्येक समयीं हिंसा करूं नये असा त्या फरमानाचा खरोखर अर्थ होतो काय?" विचाऱ्या मुलींना जें शिक्षण देण्यात येत होतें त्या शिक्षणाच्या प्रभावानें त्यांच्या इच्छे विरुद्ध त्यांना असा जबाब द्यावा लागला कीं 'नेहमींच असा अर्थ होत नाहीं; लढाईंत त्याच प्रमाणें अपराध्याची कत्तल करण्यांत हिंसा करण्याची मुभा आहे.' या प्रमाणें जबाब मिळाल्या नंतर त्या मुलीं पैकीं एका

मुलीला पुनः असें विचारण्यांत आलें कीं, " हिंसा करण्यांत नेहमीं पाप आहे कीं नाहीं ? " ती बालिका घाबरली आणि थोडीशी लाजली तरी पण तिनें दृढतेनें असा जबाब दिला कीं:—" हिंसेमध्यें सदासर्वदा पाप आहे " धर्मगुरूनें त्याच मुलीला आणखी या बाबतींत प्रश्न विचारतां तिनें दृढतेनें जबाब दिला कीं:—" हिंसेची जुन्या करारांत ( ओल्डटेस्टेमेंटमध्यें ) तर अजीबात मनाई करण्यांत आली आहे; व प्रत्यक्ष येशूख्रिस्तानें देखील हिंसेची मनाई केली आहे. परंतु हिंसेंत तर पाप आहे इतकेंच नव्हे पण कोणाचें थोडें देखील वाईट करण्यांत देखील पाप आहे. " असा त्या बालिकेनें बेधडक जबाब दिला होता.

वरील वृत्तान्तावरून आपल्या लक्षांत हें सहज येईल कीं– येशूख्रिस्तानें कोणत्याही प्राण्याची हिंसा करण्या विषयीं आज्ञा केलेली नाहीं उलट ठिकठिकाणीं प्राणीमात्रांवर दया करण्या विषयींच फर्माविलें आहे. पहा " ख्रिस्ताचें अनुकरण " नांवाचें पुस्तक.

" जगांतील सर्व पदार्थांचें मला संपूर्ण ज्ञान असलें, पण माझ्या ठिकाणीं दयेचा वास नसला तर प्रभू समक्ष मला या ज्ञानाचा काय उपयोग होणार ? प्रभू समक्ष माझा न्याय तर माझ्या कर्मानुसारच होणार. " ( पृ. १९ )

" जो भूतदयेंत मोठा, तोच खरोखर मोठा आहे. (पृ.२९)

" सर्व प्राणिमात्रांवर दया, अनुकंपा–ठेवावी, परंतु सर्वां बरोबर परिचय ठेवणें इष्ट नाहीं. " ( पृ. ३२ )

क्राइस्टाचीं वरील वचनें प्राणीमात्रांव [illegible] वी या बाबतींत कित्ती जोरदारपणें बोध करणारीं आहेत तें निराळें दाखविण्याची कांहीं जरूरी नाहीं. [illegible] क्राइस्टानें अशा प्रकारच्या आज्ञा केल्या आहेत–

उपदेश केला आहे–त्याच ख्रिस्ताचे अनुयायी जीव दयेच्या नांवाला देखील विसरून जातात आणि हिंसा वृत्तींत तल्लीन होतात हें केवढें मोठें खेद उपजविणारें कृत्य आहे ?

## जरथोस्ति धर्मांत अहिंसा.

याच प्रमाणें पारशी आणि अशाच दुसऱ्या सर्व ज्ञातीमध्यें धर्मशास्त्रें जीव–प्राणिमात्रांच्या–हिंसे विषयीं स्पष्ट मनाच करितात; असें असुन देखील त्या जातींत, पुष्कळ हिंसकवृत्तीचे लोक पाहण्यांत येतात. जरथोस्ति धर्माच्या सिद्धान्तांत जीवांच्या रक्षणासाठीं जीवदयेचें पैगंबरानें खास फरमान केलें आहे. पारशी बंधूंच्या सर्वमान्य **गाथ्या** मध्यें स्पष्ट सांगितलें आहे कीं:–" जीवजंतूंचे खास–विशेषें–करून रक्षण करावें. पशूंची कत्तल करण्याच्या कृत्याला **अहुरमजद** भयंकर दुष्कृत्य गणतात. शिवाय एथ पावेतों सांगण्यांत आलें आहे कीं:–पशूंना दाणाचारा घालण्यांत केलेल्या बेदरकारी विषयीं देखील खऱ्या अंतःकरणानें प्रार्थना करावी. गाथ्यांतील तीं तीन्हीं वचनें या प्रमाणें आहेत:—

( १ ) गाथा हा. ३२; १२ **" जे सर्वांहून उमत्त तऱ्हेची जिंदगी गुजरविण्या पासून लोकांना अटकावितात आणि जे पशूंना मारून टाकण्याविषयीं आनंदानें खुशाल शिफारस करितात त्यांना अहुरमजद दुष्ट म्हणून गणतात. "**

( २ ) गाथा हा. ३४; ३–**होरमजदच्या राज्यांत सर्व पशूंचें रक्षण वहमान अमशास्पंद यानीं केलें होतें.**

( ३ ) गाथा हा. ३३; ४–**"होरमजद! पशूंच्या दाणाचाऱ्या संबंधीच्या माझ्या बेदरकारीला मीं खऱ्या अंतःकरणानें प्रार्थना करून दूर केलें तर कितीवरें चांगलें होईल ?**

जरथोस्ति धर्माच्या अनुयायांचे परमपूज्य **अहुरमजद** पशूंच्या कत्तलीला किती वाईट समजतात हें वरील वाक्यांवरून स्पष्ट समजतें. **अहुरमजद** यांना दया ही सर्वांहून प्रिय आहे. जर जरथोस्ति धर्माचे अनुयायी वरील तीन नियम बरोबर लक्षांत घेतील, तर त्यांचा असा निश्चय झाल्या शिवाय राहणार नाहीं कीः—पैगंबरानें जनावरांची हिंसा करून मांसाहार करण्याची अजीबात मनाईच केलेली आहे.

जरी ही गोष्ट खरी आहे कीं पारशी बंधू स्वतः पशूंचा वध करीत नाहींत, तरीपण अमुक दयाळू पारशी बंधूंना सोडून देऊन, बाकीचे पारशी बंधू मांसाहारी असल्या मुळें त्यांच्या निमित्तानें हजारो जीवांची कत्तल होत आहे यांत तर कोणाच्यानेंही नाहीं म्हणणें शक्यच नाहीं.

खरोखर पाहूं गेलें असतां भारतवर्षीय मनुष्ये मांसाहारी झालीं त्याचाच हा परिणाम झाला आहे कीं भारतवर्षांतील मनुष्यांनीं आपलें सर्वस्व गमाविलें आहे! एका बाजूला जीव हिंसेच्या पापामुळें ठिकठिकाणीं प्लेग, कॉलेरा, इनफ्लुएन्झा, अग्नि, अतिवृष्टि, अनावृष्टि, महापूर यांसारख्या निरनिराळ्या कारणांनीं लाखो मनुष्ये मृत्युमुखीं पडताहेत! तर दुसऱ्या बाजूला मनुष्य जातीवर अनंत उपकार करणाऱ्या पशूंचा संहार होत असल्या मुळें दूध, दहीं, तूप तसेंच चांगल्या कापडाच्या अभावीं देखील भारतवर्षाची प्रजा दुःखी आहे. भारतवर्षांत आतां मांसाहाराचा इतका जास्त प्रचार झाला आहे कीं—कित्येक देशांत ब्राह्मण, वाणी वगैरे सारख्या उच्च जातींतील मनुष्यांचें एक दिवस देखील मांसा शिवाय चालूं शकत नाहीं; इतकेंच नाहीं पण त्यांच्या येथें जेवावयाच्या वेळीं वाटेल तितक्या निरनिराळ्या प्रकारचीं पंचपक्वान्नें, भाज्या, चटण्या वगैरे तयार केलेल्या असल्या, पण त्यांच्या बरोबर लहान लहान मासळ्यांचें रायतें जर नसलें तर त्यांच्या त्या दिवशीच्या जेवणांत तितकी न्यूनता असे ते

मानतात! अरेरे! आर्यभूमींत उत्पन्न होऊन, व उत्तम अशा मनुष्य कोटींत आणि उच्च कुळांत जन्म पावून देखील जीं माणसें अनर्थकारक तसेंच राक्षसीपणाचें वर्तन करितात—जणूंकाय मनुष्याऐवजीं त्यांचा जन्म राक्षस कुळांतच झाला आहे—त्या मनुष्यांच्या पापांचें प्रायश्चित्त त्यांना याच जन्मांत काय म्हणून मिळणार नाहीं? देशांत दुर्भिक्ष आणि रोगांचा प्रचार काय म्हणून होणार नाहीं! मी तर स्पष्ट आणि बेधडक असें म्हणूं शकतों कीं देवीच्या समोर होणारा पशुवध, दसऱ्याच्या निमित्तानें होणारा पशुवध, आणि अशाच दुसऱ्या बाबतींत होणारा पशुवध हा मांसाहाराचाच परिणाम आहे.

## पशूंचा उपयोग.

जसजशी मांसाहाराची प्रवृत्ति वाढत गेली तसतसें मनुष्यांनीं अशा अनेक रीतीनें धर्माच्या निमित्तानें पशूंच्या वधाचें विधान दाखल केलें; व याचा असा परिणाम झाला कीं भारतवर्षांतील लाखो आणि कोट्यावधी पशूंचा संहार होऊं लागला. पशू जे आमच्या देशाचे रक्षक आहेत, पशू जे आमच्या शरीराचें पोषण करितात त्या पशूंचा संहार झाल्यानें मनुष्यें आपल्या स्वतःचें कसें रक्षण करूं शकतील? पशूंच्या बाबतींत एका कवीनें म्हटलें आहे कीं —

(कवाली—गजल.)

" आमुच्या भूमिचे रक्षक खरोखर हे पशू असती ॥
मातृ भूमिची दौलत (लक्ष्मी) खरोखर हे पशू असती ॥
अमुचे अतुल बळ बुद्धी खरोखर हे पशू असती ॥
सत्य स्वोन्नति—पाया खरोखर हे पशू असती ॥ "

कवीचें वरील कथन सर्वथैव सत्य आहे. भारतवर्षीय प्रजेचा सर्व

आधार पशूंवरच आहे. पशूंच्या श्रमामुळेंच म्हणजे त्यांच्या द्वारेंच धान्याची उत्पत्ति होते; व पशूंमुळेंच दहीं, दूध, तूप वगैरे मिळतें. या तीन जिनसाच ( दहीं, दूध, तूप ) भारतवर्षांतील प्रजेच्या शारीरिक आणि मानसिक शक्तीच्या आधारभूत आहेत. भारतवर्षांत एक काल असा होता कीं त्यावेळीं दोन आणि अडीच रूपयांना मणभर तूप मिळत असे. आज काल असा आला आहे कीं पन्नास रुपये मणाला देऊन सुद्धां उत्तम तूप मिळण्याला अडचण पडते !—प्रसंगोपात मिळत देखील नाहीं. अशाच प्रकारची दुधाची देखील स्थिति आहे. दूध ही आपली नेहमींच्या जरूरीची वस्तु आहे व त्याचा देखील अभाव झाला आहे. चांगलें दुध मिळण्याला किती अडचण पडते याची जाणीव प्रत्येकाला आहेच. तसेंच दूध इतकें महाग झालें आहे कीं चाळीस रूपये भाराच्या शेराला तीन आणे देऊन सुद्धां हवें तेवढें चांगलें दूध आज मिळत नाहीं ! बिचाऱ्या गरीब आणि साधारण स्थितींतल्या माणसांना तर दुधाचें दर्शन सुद्धां दुर्लभ झालें आहे ! शरीरांत थोडी कांहीं व्याधि झाली कीं डाक्टर साहेब लागलींच सांगतात " नुसत्या दुधावर रहा कांहीं खाऊं नका "; पण तसें चांगलें दूध गरीबांनीं आणावयाचें तरी कोठून ? अशा दुधाच्या भयंकर अभावीं मनुष्याच्या मेंदूंत तरतरी यावी तरी कोठून ? मेंदू तरतरीत करणें तर बाजूलाच राहूंद्या पण स्वतःच्या प्राणाचें रक्षण देखील अतिशय कठीण झालें आहे !

अशा तऱ्हेनें एकीकडे दूध, दहीं तूप वगैरेंचा अभाव झाला आहे तर दुसरीकडे आपल्या शरीररक्षणाचें एक साधन असें चांगल्या तऱ्हेनें गरम कापड त्याचा देखील बऱ्याच अशानें अभाव झाला आहे. काश्मीर त्याच प्रमाणें दुसऱ्या देशातून मेंढ्यांच्या लोंकरींचीं, बकऱ्यांच्या केसांची बनविलेली उत्तम कांबळी येत होतीं तीं आतांशा कोठें पाहण्यांत येतात ? पशमीनाची चादर, लुई, आणि अशाच दुसऱ्या निरनिराळ्या जातीच्या

कांवळींचा आतांशा एवढा मोठा अभाव आलेला आहे कीं, मर्यादेबाहेर पैसा खर्च करूनही जशी पाहिजे तशी चांगली गरम कांबळी मिळत नाहीत. अशा स्थितींत गरीब व मध्यम वर्गांतील लोक यांच्या नशीबीं गरम कापड कोठचें ? मग चांगल्या गरम कांबळीची तर गोष्टच विचारूं नका. या सर्वांचें मूळ कारण तपासूं लागलों तर तें पशू संहार हेंच होय. पशू संहाराची आपण जर गणती करूं लागलों तर आपणाला, आपल्या देशांतील लक्ष्मीचा प्रत्यहीं केवढा भयंकर ऱ्हास होत आहे हें तावडतोब लक्षांत येईल; व या लक्ष्मी ऱ्हासानें अथवा संपत्तिनाशानें मूळ कारण मीं प्रथमतःच सांगितलें आहे तेंच-मांसाहार ! हें होय ! अज्ञानी मनुष्य "**माच्याला-खव्याला सोडून मांसाकडे वळले. आणि दूध सोडून देऊन दारूच्या मागें लागले;** आणि याचाच हा परिणाम आहे कीं प्रतिदिनीं लक्षावधि आणि कोट्यावधि जीवांचा संहार होत आहे !

## काय ? मांस हें मनुष्यांचें नैसर्गिक अन्न आहे ?

खरोखर विचार करून पाहिलें तर मांस हें मनुष्याचें नैसर्गिक अन्नच नाहीं; व तें केव्हांही नव्हतें. तत्ववेत्त्यांना आणि मनुष्याच्या पूर्व-कालीन स्थितीचा शोध करणाऱ्या इतिहासवेत्त्यांना आपल्या शोधांत असें दिसुन आलें की, ज्या कालाला कित्येक जण आदिकाल म्हणतात, त्या आदिकालांत मनुष्य मुळींच मांसाहारी नव्हते. सुप्रसिद्ध इतिहासवेत्ता **श्रीयुत राखालदास बंदोपाध्याय,** यांनीं आपल्या 'बंगालार इतिहास' नांवाच्या बंगाली पुस्तकाच्या पहिल्या भागाच्या तिसऱ्या पानांत म्हटलें आहे कीं-"*पृथ्वीतत्व आणि प्राणीतत्व यांना* जाणणारे अशा निर्णयावर आले आहेत कीं मानवजातीच्या शैशव-कालांत मनुष्य शाकाहारी होते. मानवजातीच्या जन्माचा इतिहास अजून देखील अंधकारांतच आहे. समग्र मनुष्यजातीचे पूर्व पुरुष

एकाच स्थानी आले की नाहीं हें कांहीं सांगता येत नाहीं. तेव्हां असा निश्चय होतो कीं मानव जीवनाच्या प्रारंभीं आमचे पूर्वज फलाहारी होते. ( मांसाहारी नव्हते. ) तदनंतर युगपरिवर्तनाच्या कारणानें मनुष्यांच्या जन्मा नंतर पुष्कळ दिवसांनीं ग्रीष्म प्रधान अथवा फार शीतंही नाहीं व फार उष्णही नाहीं असा देश समूह, क्रमशः अथवा एकदम शीत प्रधन झाला. त्या कारणामुळें आदि मनुष्यांच्या लीलाक्षेत्र समूहांत, जीवनाला उपयुक्त अशा फलांचा व फुलांचा अभाव झाला. या परिवर्तनाच्या युगांत त्या आदि मनुष्यांना निरुपायानें फल–मूलांच्या परिवर्तनामुळें पशुमांसाच्या भोजनाला प्रवृत्त व्हावें लागलें. जगांत मांसाहारी जीवांना जन्मकाला पासून जशीं तीक्ष्ण नखें, दांत वगैरे असतात तशीं मनुष्यांना कोणत्याही स्थितींत नसतात; त्यामुळें आपल्या जीवन यात्रेच्या निर्वाहा साठीं पशु हत्येला उपयोगी अशीं शस्त्रें शोधण्याची त्या आदि पुरुषांना प्रवृत्ति झाली. त्यांनी त्यावेळीं देखील कृत्रीम उपायानें अग्नि उत्पन्न करण्यानें शिक्षण मिळविलें नव्हतें; विशेषतः धातूचा उपयोग त्यांना माहीतच नव्हता. त्या युग विप्लवाच्यावेळीं जें आयुध अथवा प्रहार करण्यानें शस्त्र याना आमच्या पूर्वपुरुषांनी संग्रह केला आहे तें म्हणजे ' तीक्ष्ण धारेचा एक दगडाचा तुकडा' च मात्र होता. (दुसरें कांहीं देखील नव्हतें.)" "

, वरील हकीगती वरून आपणाला असें दिसुन येतें कीं प्राचीन तत्वाचा शोध करणारे ज्या कालाला आदिकाल म्हणुन मानतात त्या कालीं देखील मनुष्ये मांसाहारी नव्हती परंतु अमुक दृष्टाए कारणामुळें– फलफुलांचा अभाव झाल्यामुळें–त्यांनां पशुपास राहण्याकडे प्रवृत्ति झाली होती. तरी देखील तें विद्वान शोधक त्याच बरोबर असेंही सांगतात कीं मांसाहारी प्राण्यांना जशी नखें, दांत वगैरे असतात तशी नखें दांत

वगैरे मनुष्यांना नाहींत; व त्यामुळें मनुष्यांना आपल्या जीवन-निर्वाहा साठीं कृत्रीम उपाय शोधावे लागले होते.

जैन सिद्धांतांत देखील श्रीयुत राखालदास बंदोपाध्याय यांच्या वरील विचारांचेंच समर्थन केलेलें पाहण्यांत येतें. अर्थात जैनसिद्धांतात देखील-ज्या कालाला श्रीयुत राखालदास आदिकाल म्हणून ठरवितो-या कालाच्या व्यवहारिक युगाच्या प्रथमारंभीं श्रीयुत राखालदासानें आपल्या पुस्तकांत मनुष्यांची जी स्थिति दाखविली आहे तशीच स्थिति दाखविलेली आहे; म्हणजे त्या काळीं मनुष्य फलाहारीच होते असें दाखविलें आहे. पुढें जसजसा काल बदलत गेला तसतसी मनुष्यांनीं स्थिति परत्वें नवीन कला आणि हुन्नर उचलले व त्या बरोबरच खास अनिवार्य कारणामुळें आहार व्यवहारांत देखील परिवर्तन होत गेलें.

अशा रीतीनें वेळोवेळीं अमुक अमुक कारणांनीं अज्ञानी मनुष्यांमध्यें मांसाहाराची प्रवृत्ति चालू झाली; परंतु तदनंतर हळूं हळूं त्या प्रवृत्तीला त्या वस्तूच्या लालची माणसांनीं-मांसाहार लोलुप माणसांनीं-धर्माच्या निमित्तानें ईतर दुसऱ्या कर्मांत घुसडून दिलें; परंतु वास्तविक पाहूं गेलें तर मांसाहार हा मनुष्याचा नैसर्गिक आहारच नाहीं; व ही गोष्ट आपण वरील हकीकती वरून स्पष्टपणें समजूं शकतों इतकेंच नाहीं तर या बाबतींत आपण जास्त चौकशी केली तर मांसाहारी प्राण्या प्रमाणें, मनुष्यापाशीं एक देखील वस्तु आपणाला दिसणार नाहीं. मनुष्याला मांस पचवूं शकेल असा जठराग्नि नाहीं; तसेंच पूर्वी सांगितल्या प्रमाणें मनुष्याला मांसाहारी प्राण्या प्रमाणें दांत ही नाहींत. या वरून हें उघड होतें कीं मनुष्याचें नैसर्गिक अन्न फळ वगैरेंच आहे. आतां या विषयीं आपण याहून ही अधिक बारकाईनें अवलोकन करूं.

या जगांत जेवढे मांसाहारी प्राणी आहेत, त्या सर्वांचा स्वभाव आणि मनुष्याचा स्वभाव यांत महत् अंतर आहे. सिंह, वाघ, लांडगा, कुत्रा, मांजर वगैरे मांसाहारी प्राणी आहेत. त्या सर्वांना पाणी पितांना पाहिलें तर आपणाला असें दिसून येईल कीं हे सर्व प्राणी जीभेनें पाणी पितात, मनुष्य जीभेनें पाणी पितात काय? मांसाहारी प्राण्यांचे दांत नैसर्गिक वांकडे असतात. मनुष्याचे तशा प्रकारचे नसून चपटे असतात. मांसाहारी प्राण्याचें जठर अशा प्रकारचें असतें कीं त्यांत मांस लौकर पचन होऊं शकतें पण मनुष्याचें जठर तशा प्रकारचें नसतें. खरोखर पाहिलें तर मांस खाणाऱ्याचें पोट, हें पोट नसून एक प्रकारची भयंकर दरी आहे—नव्हे तें एक कबरस्तान आहे. मेलेल्या अथवा मारलेल्या जीवांच्या मुर्दांना पोटांत घालणें—पोटरूपी भयंकर दरींत घालणें—या दरीला—पोटाला—कबरस्तान न म्हणावें तर म्हणावें तरी काय? हें पोट म्हणजे खरोखरीच कबरस्तान; दुसरें काय? आणि अशा रीतीनें त्या पोटाला—नव्हे पण मुर्दांच्या कबरस्तानाला बरोबर घेऊन, मनुष्य आपल्या धर्मस्थानांत—पवित्र धर्मस्थानात—जाण्याला वास्तविकपणें अधिकारी तरी होऊं शकतो काय! ज्या वस्तूला मनुष्य जातीनें स्पर्श देखील करूं नये त्या वस्तूचे तुकडे तुकडे करून ती वस्तु आपल्या पोटांत घालणें हें केवढें भयंकर किळसवाणें आणि तिरस्कार उत्पन्न करणारें कार्य आहे याचा खरोखरच बुद्धिमान पुरुषांनीं विचार केला पाहिजे.

मांसाहारी मनुष्य प्रथमतः तर आपल्या मानुषी अंतःकरणाला राक्षसी बनवितो; म्हणजे मनुष्य जातीला उचित आणि त्याला शोभविणारी अशी जी दया त्याच्या अंतःकरणांत नेहमीं असावयाला पाहिजे ती नष्ट होते. मांसाहारी माणसाचे मानसिक विचार हे रात्रंदिवस क्रूरतेनें भरलेलेच असतात. तो नदी अथवा समुद्र किनाऱ्यावर गेला असतां

पाण्यांत आनंद करीत असलेल्या मनोहर माशांना पाहून आनंदानें त्यांचे विहार बघण्या ऐवजीं उलट त्या गरीब आणि निरपराधी प्राण्यांना धरण्याचीच इच्छा करितो. त्याला ते सुंदर मासे धरण्याचीच बुद्धि सुचते. चांगला पुष्ट मेंढा अथवा बकरा पाहिला कीं त्याला त्याचें मांस खाण्याचेच विचार सुचतात. कोंबडीच्या अंड्यांतील रस पिणाऱ्यांच्या दृष्टीला अंडें पडलें कीं त्यांची दृष्टीच त्या कडेस धांवते व त्यांचें मन रस पिण्याकडे आकर्षिलें जातें. सारांश मांसाहारी मनुष्याच्या मनांत रात्रंदिवस अशाच तऱ्हेचे विचार येत असतात.

एखाद्या माणसाला एखाद्या पदार्थाची सवय लागली कीं तो इसम त्या वस्तूंतील सद्गुण दाखविण्या विषयीं स्वाभाविकपणें प्रेरित होतो. बिडी ओढणाऱ्यांनीं बिडीमुळें आपल्या काळिजाला जाळून कां टाकलेलें असेना, आणि बिडीच्या व्यसना पासून ते क्षय, दम, वगैरे रोगांच्या आधीन कां झालेले असेनात, त्यांना बिडी सोडण्या विषयीं जेव्हां सांगण्यांत येते तेव्हां ते सांगतात कीं:—' बिडी अन्न पचविते '. त्याच प्रमाणें दारू पिणारे व मांस खाणारे यांची ही स्थिति आहे. दारू पिणारे दारू प्याल्या नंतर आपल्या बहिणीला आपली बायको म्हणून संबोधण्याला लाजत नाहींत; विष्टा किंवा चिखल यांचें देखील त्यांना भान राहत नाहीं. चिखल म्हणून कित्येक वेळां डोकें शांत होण्या साठीं विष्टा कपाळाला फासतात. असें असून देखील दारूबाज दारूचे गुण गाण्याला बाहेर पडतात. हाच मासला मांसाहारी लोकांचा. मांसाहारी माणसाला श्वास भरतो—दम्याची व्यथा असते, त्याचें पोट नेहमीं फुगतें, त्यांच्या तोंडातून नेहमीं लाळ पडत असून, तोंडांत तर भयंकर दुर्गंधीच असते. शरीरांतील वास्तविक आणि खरी शक्ति गमावून खोटी स्थूलता व अमानुषी क्रूरता ते प्राप्त करून घेतात, आणि शरीरांतील मांसाच्या ठिकाणीं वात आपटे ठाणें देतो; अशी

मांसाहारी माणसांची खरोखरीच शोचनीय स्थिति असून ही मांसा
माणसें आपला बचाव करण्या साठीं आग्रहानें असें सांगण्याला
येतात कीं —" मांसाहार बळ आणि वीरत्व वाढवितो. " हें त
म्हणणें कितपत सत्य आहे याचा आपण थोडासा बारकाईनें विचार क

## काय मांसाहार बळ वाढवितो ?

मांसाहार करण्यानें जर बळ वाढत असतें, तर हत्तीपेक्षां सिं
मध्यें जास्त बळ असावयास पाहिजे. परंतु तसें नाहीं. हत्तीच
ठिकाणीं जी शक्ति किंवा जें बळ आहे तें सिंहामध्यें नाहीं. हत्ती
वजन उचलूं शकतो तें सिंह कांहींही उचलूं शकत नाहीं. कदाचि
कोणी असें म्हणेल कीं ' जर हत्तीपेक्षा सिंहात बळ कमी असतें ,
सिंह हत्तीला कसा मारून टाकतो ? ' याचें उत्तर सोपें आ
सिंह हा हत्तीला मारून टाकतो यात सिंहांच्या बळाचें कांहींच कार
नाहीं. हत्ती फलाहारी असल्यानें तो स्वभावानें शांत आहे; व उल
पक्षीं सिंह मांसाहारी असल्यामुळें फारच क्रूर आहे आणि क्रूर
मुळेंच तो हत्तीच्या शांत स्वभावाचा फायदा घेऊन मोकळा होतो
वास्तविक आपली गंभीरता व शांतता यांना क्षणभर बाजूल
ठेऊन हत्तीनें आपल्या सोंडेनें सिंहाला पकडलें तर त्या सिंहाचे हत्त
जरूर तुकडे तुकडे केल्या शिवाय राहणारच नाहीं. या वरून हें स्पष्ट
होतें कीं मांसाहार क्रूरतेला वाढवितो. उलटपक्षीं फळाहार शांतील
वाढवितो. परंतु या बरोबरच आपण हें ही विसरता कामा नये कीं:—
मनुष्य जातीला क्रूरता कांहींच कामाची नाहीं कारण क्रूर मनुष्य धर्म-
कृत्याला लायक राहत नाहीं, इतकेंच नाहीं परंतु त्याच्या ठिकाणीं
विचार करण्याची देखील शक्ति राहत नाहीं. तो आपल्या क्रूरतेचा
उपयोग अस्थानीं सुद्धां करून टाकतो. क्रूरता धारण करणारा असा

क्रूर मनुष्य यांची आपल्या घरांत स्वतःच्या स्त्री अथवा पुत्रा बरोबर थोडी जरी तकरार झाली तर त्यांचा देखील प्राणघात करण्याला तो तात्काळ तयार होतो. स्त्री पुत्रांचा प्राणघात करणें हें भयंकर पाप असून दुष्कृत्य आहे याचा तो थोडा देखील विचार करीत नाहीं. ही क्रूरता मनुष्यजाती साठीं मुळीं कामाचीच नाहीं. कोणी असें म्हणतात कीं, क्रूर मनुष्ये लढाईमध्यें चांगले पराक्रम दाखवितात, पण तें देखील खोटें आहे. यावेळीं रुसो जपानी युद्धाचा सर्व चित्रपट आपण आपल्या डोळ्या-समोर आणा. रशीयांतील लोक मांसाहारी असल्यानें महान् क्रूर होते; उलटपक्षीं जपानी लोक फलाहारी-शाकाहारी-असल्यामुळें शान्त स्वभावाचे होते. रशीयनाचें मनुष्यबळ अधिक होतें; व उलटपक्षीं जपानी लोकांची संख्या अल्प होती. रशीयनांच्या ठिकाणीं एवढी महान् क्रूरता असून, तसेंच त्यांचें मनुष्यबळ जपानी लोकांपेक्षां जास्त असून देखील शांत स्वभावाच्या अल्प संख्यांक जपानी लोकांनीं रशीयनांना कसें पराजित केलें ! त्यावेळीं रशीयनांची क्रूरता कां कामाला आली नाहीं ? त्या क्रूरतेनें आपलें कार्य कां बजाविलें नाहीं ? हें समजणें कांहीं मोठें मुष्किल नाहीं. अगदीं सोपें आहे. कारण क्रूर मनुष्यांचें चित्त अतीशय अस्थिर असतें आणि त्या अस्थिरते मुळेंच त्यांना हार खावी लागते.

## काय मांसाहारानें वीरता वाढते ?

आता मांसाहार वीरतेला वाढवितो या गोष्टीकडे आपण लक्षपूर्वक पाहूं. विचारानी असें कळतें कीं, मांसाहार वीरतेला कधींच वाढवीत नाहीं. मांसाहारांत वीरता वाढविण्याची शक्ति असती, तर दुनियेंत हीनसत्व कोणीही राहिला नसता. अहो ! नपुंसक अथवा ज्यांना हिजडे म्हणतात ते देखील मांसाहार करकरून खासे स्त्रीप्र मर्द

•अन्न मिळविणें दुरापास्त आहे तरी तें मिळणें कठीण पडूं नये म्हणून पाहिजे तितक्या स्वतंत्र शाकाहारी लोकांच्या खाणावळी, उपहारगृहें यांनीं या मंडळ्या स्थापना करवीत आहेत. या मंडळ्या खास दोन बाबतींची जनतेंत प्रसिद्धि करतात. एक ' मांसाहारा पासून शारिरीक निरोगीपणाचा नाश' व दुसरी 'आर्थिक दृष्टीनें पशूंच्या संहारा पासून मनुष्यांना सहन करावी लागणारी हानि ' या दोन्हीही बाबी खरोखर फार महत्वाच्या आहेत. या वरून असें सिद्ध होतें कीं आपण धार्मिक दृष्टीनें या बाबतींत जरी विचार केला नाहीं–धर्माची बाजू बग-ळली–तरी देखील शारीरिक आणि धार्मिक दृष्टीनें सुद्धां मांसाहर मनु-ष्यांना सर्व प्रकारें नुकसानकारक आहे.

कित्येक मुंठीच्या एका कुड्यानें गांधी बनणारे मारुन मुटकून वैद्य बुवा किंवा अर्धदग्ध हकीम अथवा डाक्टर–असें देखील उघड प्रति-पादन करणारे आढळतात कीं ' मांसाच्या खुराकांत मेंदु खावयाला मिळतो व त्या मेंदूतुन फॉसफरस मिळतो '. त्यांची ही विचार सरणी अथवा त्यांनें हें विधान अजीबात खोटें आहे. एक विद्वान पारसी डाक्टर असें सांगतात कीं.–' वनस्पति आणि सुकलेल्या मेव्यांत ( बदाम, पिस्ता, आक्रोड, काजू, किशमिस, अंजीर, मनुका, जरदाळू, वगैरे ) जितक्या प्रमाणांत फॉसफरस असतो तितका प्राण्यांच्या मेंदूत नसतो. ' सारांश कीं–ज्या मनुष्याना मांस आणि दारुची सवय जडते ते मग असा वेडा वाकडा बचाव आपल्या तर्फे नेहमीं पुढें आणतात. आपण त्यांना विचारूं कीं, जे मांसाहार करीत नाहींत ते काय मरून गेले ? जे यूरोपीयन लोक मांसाहार करीत होते व जे आतां शाकाहारी झाले आहेत ते काय सुकून गेले ? मरून गेले ? या शिवाय कित्येक लोक आपल्या देशाचा–आपल्या मात

मांसाहार न केला तर चालत नाहीं, आमचें शरीर टिकणारच नाहीं व मांसाहारा शिवाय आमच्यानें राहवत नाहीं ' हें म्हणणें देखील निराधार आहे. जर हें म्हणणें सत्य असतें तर यूरोपातील शाकाहाऱ्याच्या कपाळीं वरील संकट यावयालाच पाहिजे होतें. परंतु तसें कांहींच झालें नाहीं, उलट यूरोपांतील शाकाहारी तेथील मांसाहाऱ्यापेक्षां फार आनंदानें आपलें आयुष्य घालवीत आहेत. यूरोपातील गोष्ट कशाला? बंगालच घ्याना. तेथील सर्व बंगाली लोक प्राय मांसाहारी आहेत. त्या लोकांचा खुराक बहुशः मासळी व भात. म्हणजे त्याचा नेहमींचा खुराक मांसाहाराचा असून त्या देशांतील विधवा व वैष्णव मांसाहार बिलकूल करीत नाहींत. तर मग त्यांचें कोठें नडतें? काय त्यांचें चालत नाहीं? जरूर चालतें आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं मनुष्ये आपल्या जिव्हेन्द्रियाच्या लाळची सोडू शकत नाहीत आणि म्हणून पुष्कळशीं निरनिराळीं कारणें पुढें करितात.

## काय मांसाहारी धर्मक्रिया करण्याला पात्र होऊं शकतो?

मांसाहार करणारा मनुष्य एवढा अपवित्र असतो कीं मग तो कोणत्याही प्रकारची धर्मक्रिया किंवा ईश्वरभक्ति करण्याला योग्य राहत नाहीं. कारण प्रत्येक दर्शनकाराचा व धर्मानुयायाचा असा नियम आहे कीं जोपर्यंत शरीरांत अपवित्रता आहे तोपर्यंत त्याच्यानें कोणतेंही धर्मकृत्य होऊं शकत नाहीं या नियमानें इतक्या बारीक दृष्टया पाहून केलें जातें कीं शरीरावर पांघरलेल्या अथवा नेसलेल्या वस्त्रावर जर एखादा रक्ताचा डाग किंवा अपवित्र वस्तु पडली असेल तरी देखील धर्मकार्य होऊं शकत नाहीं सर्व धर्मांच्या शास्त्रकारांना मयत झालेल्या सुतक विटाळ [illegible] असा एक नियम आहे कीं जर एखाद्या धर्मस्थाना नजीक एखाद्या प्राण्याचें शव पडलें असेल तर तें त्या

करण्या लायक वीर पुरुष बनले असते. परंतु तसें नाहीं; कारण मांसाहार वीरतेचा वाढवीनच नाहीं. बंगाल आणि मगध देशांत मांसाहारी लोकांचें प्रमाण पुष्कळ अधिक आहे. बरेचसे लोक मांसाहारी आहेत. असें असून बंगाल्यांतील पन्नास मांसाहारी लोक्त समोर जर नर्मीकन्या छपरा जिल्ह्यातील दहाच माणूस-( जे फक्त सातूच्या पीठावर राहतात असे ) मारामारी अथवा लढाई करण्याला उभे राहिले, तर मांसाहारी बंगाली थोडा वेळ सुद्धा त्या मांसाहार न करणाऱ्या दहा माणसां बरोबर टिकाव धरूं शकणार नाहींत. मांसाहारी यांना थोडेसें श्रम झाले कीं लागलेंच ते थकून जाऊन धापा टाकावयाला लागतात; पण उलट फलाहारी एकदम थकून जात नाहींत व शांत चित्तानें वीरतापूर्वक आपलें काम करितात. या बाबतींत एका विद्वान डाक्टरानें असें म्हटलें आहे कीं.—" अन्न, फल, भाजी वगैरेंचा खुराक, हें शरीरपोषण, उष्णता व काम करण्याची शक्ति पूर्ण प्रमाणांत देण्याला समर्थ आहे, यांत मुळींच शंका नाहीं, व या सात्विक अन्नापासून वरील बाबतींत पूर्तता होत नाहीं असें म्हणणारे ज्ञानहीन अर्धदग्ध लोक असले पाहिजेत. या सात्विक अन्नावर मनुष्यमात्र निरोगिता आणि दीर्घायुष भोगूं शकतें, व वरील विधानाच्या सत्यत्वांत शंका न राहण्याचें दुसरें असेंही कारण आहे कीं, सध्यां कोट्यावधि मनुष्यें एक अथवा दुसऱ्या कारणानें आपलें आयुष्य केवल शाकाहारी म्हणून केंठूं लागले आहेत. "

## मांसाहारी व फलाहारी यांची तुलना.

खरोखर पाहिलें तर बळ आणि वीरत्व याचा सर्व आधार मनुष्याच्या वीर्यावर अवलंबून आहे; व वीर्य पुष्टीचा आधार मांसावर नसून अन्न, फळ आणि दूध इत्यादि पदार्थांवर आहे. मांसाहारी मनुष्य पन्नास

–पाउणशे मणाचा दगड छातीवर ठेऊन फोडूं शकत नाहीं पण वीर्य रक्षण करणारा पक्का ब्रह्मचारी अथवा फलाहारी मनुष्य तें कार्य करूं शकतो. जपानी लोक फलाहारी असून बलवान आहेत. उलट चिनी लोक मांसाहारी असून निर्बल व आळशी आहेत. अशा तऱ्हेच्या अनेक प्रमाणांवरून असें सिद्ध होतें कीं मांसाहार बळ आणि वीरत्व यांना वाढवीत नाहीं पण उलट शरीरांतील असलेलें खरें बळ देखील नष्ट करितो.

एकवेळां विलायतेंत शाळेंतील मुलांचे दोन वर्ग करण्यांत आले होते व या बाबतींत मुद्दाम परिक्षा घेण्यांत आली होती कीं, मांसाहारी आणि फलाहारी–शाकाहारी–यां दोहो मध्यें कोण जास्त कार्य करूं शकतो? या परिक्षेंत असा निर्णय झाला कीं प्रत्येक कार्यांत मांसाहारी विद्यार्थ्यां पेक्षां फलाहारी विद्यार्थी उत्तम ठरला. व त्याचान पुढें असा परिणाम झाला कीं हल्लीं विलायतेंत शाकाहारी इसमांच्या अनेक संस्था व मंडळें निघत आहेत व पुस्तकें आणि लहान लहान इस्तेहिरात्य हस्तपत्रकांच्या द्वारें शाकान्न गुणावह असल्याबद्दल मंठ शोध करित आहेत; इतकेंच नाहीं पण अनेक युरोपवासीजन मांसाहाराचा त्याग करीत आहेत. अर्थात् वर्तमानपत्र वाचणाराऱ्यांना हें आतां चांगल्या प्रकारें माहीत झालें आहे कीं **' वनस्पतींचें अन्न मनुष्यजातीला अधिक फायदा करणारें आहे '** आणि या मताचे अनुयायी पाश्चात्य देशांत दिवसें दिवस वाढत आहेत. यूरोप आणि अमेरिका खंडांत वरील विचारांचा प्रसार करणाऱ्या अनेक संस्था व मंडळें स्थापन झालीं आहेत व होतही आहेत. तीं मंडळें ' वनस्पतींचेंच अन्न मनुष्याला लाभदायक आहे आणि मांसाहारा पासून निरनिराळ्या जातीचे रोग मनुष्याला होतात ' असें सप्रमाण सिद्ध करणारीं हस्तपत्रकें आणि पुस्तकें प्रसिद्ध करतात. व भाषणाच्या द्वारेंही वरील विचारांचा प्रसार करतात. इतकेंच नव्हे या मंडळ्या न थांबता या आंदोलनाच्या योगानें जरी त्या देशांत शाकान्न–वनस्पतींचें

टीराणाहून उतरून नेले नाहीं तों पावेतों त्या स्मशानात ईश्वर भक्ति क्रिया होउ शकत नाहीं जेव्हा अशी स्थिति आहे तर ही एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे कीं जे मांस भक्षण करतात ते ईश्वरभक्तीला किंवा दुसऱ्या धर्मक्रिया करण्यास लायक कसे होऊ शकतील ? शास्त्रकार तर असे सांगतात कीं 'मृतं स्पृशेत् स्नानमाचरेत्' मुर्दाला स्पर्श केल्यास तर स्नान करा आता जी मनुष्ये मांसाहार करितात ती तर प्रत्यक्ष मुर्दाला आपल्या पोटात ठेवितात! तेव्हा त्यांनीं स्नान करून काय होणार? आणि कदाचित हजारो घागरी त्यांनीं अंगावर पाणी ओतले अथवा गंगेत बुचकळ्या मारून त्यांनीं स्नान केले तरी देखील ती पवित्र कशी होऊ शकतील ? व पवित्र नाहीं झाली तर मग ती मनुष्ये संध्या, जप, ईश्वरभक्ति वगैरे कशी करू शकतील ? बाबानानक देखील गुरुग्रंथांत असें सांगतात कीं —

> " जे रत्त लग्गे कप्पड़े जामा होय पलीत् ।
> ते रत्त खाधी मानसां तें किम निरमल चित्त" ॥ १ ॥

कपड्यावर रक्ताचा एक लहानसा डाग पडला तर शरीर अपवित्र मानले जातें—होतें मग तेंच रक्त पोटात गेले तर मन निर्मल कसें होऊ शकेल ?

बाह्य अपवित्रता म्हणजे रक्ताचे डाग वगैरे तर पाण्यानें देखील स्वच्छ होऊ शकतात, परंतु हृदयातील अपवित्रता केवळ पाण्यानें दूर होऊ शकत नाहीं म्हणून आत्मकल्याण इच्छिणारानी, ईश्वरभक्ति, ध्यान, जप वगैरे करण्याची इच्छा राखणारानी मांसाहारा पासून सर्वथा दूरच राहिलें पाहिजे हें सांगणें फक्त हिंदूकरिताच नाहीं, परंतु मुसलमान बंधू आणि दुसऱ्या जातींतील जे जे मांसाहार करितात त्या सर्वांसाठीं आहे, कारण आपआपल्या धार्मिक क्रिया प्राय सर्व धर्मांतील लोक करितात जे मुसलमान बंधू निमाज पडण्याच्या वेळीं आपले कपडे, शरि-

राची पवित्रता–स्वच्छता या विषयी फारच बारीक दृष्टीनं लक्ष देतात, तेच मुसलमानबंधू मासाहारानं आपल्या अंतःकरणाला अपवित्र करितात, इतकेंच नाहीं तर मांसाहाराच्या बाबतीत थोडें देखील लक्ष पुरवीत नाहीं, हें किती विलक्षण आणि आश्चर्यकारक आहे ?

ज्या माणसाला मांस खाण्याची सवय जडते, त्याचें अंतःकरण अगदीं निष्ठुर होत जातें. वाटेल तसा क्रूरतेचा प्रसंग आला तरी देखील त्याला त्या प्रसंगीं किळस, तिटकारा किंवा किंचित देखील दया येत नाहीं, व त्याच्या निष्ठुरतेची मजल येथ पावेतों पोहोंचते कीं एखादे प्रसंगी जर अन्य ठिकाणाहून त्याला मांस प्राप्त झालें नाहीं तर स्वतः पालन पोषण करून मोठें केलेल्या, स्वतःच्या चित्ताचें रंजन करण्यासाठीं पाळलेल्या सर्वांत लाडक्या जनावराला देखील आपल्या मांसाहारा करितां मारण्याला तो मुळींच कचरत नाहीं !

## विधियुक्त अथवा विधिरहित–उभयपक्षीं मांसाचा निषेध.

या पूर्वीच सांगण्यांत आलें आहे कीं–मांसाहाराच्या प्रवृत्तीमुळेंच जीवांची हिंसा होत आहे. जितक्या प्रमाणांत मांस खाण्याची प्रवृत्ति अधिक तितक्या प्रमाणांत जीवहिंसा अधिक. कारण असें आहे कीं प्राण्याची हिंसा केल्या शिवाय मांस मिळणें शक्य नाहीं. मनुस्मृतीच्या पांचव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं —

> " नाऽकृत्वा प्राणिनां हिंसा मांसमुत्पद्यते क्वचित् ।
> न च प्राणिवधः स्वर्ग्यस्तस्मान्मांसं विवर्जयेत् " ॥४८॥

अर्थात्–प्राण्याची हिंसा केल्या शिवाय मांस उत्पन्न होत नाहीं व प्राण्यांचा वध स्वर्गसुख देत नाहीं–उलट स्वर्गसुखापासून मनुष्याला वंचित करितो–म्हणून मांस खाणें सर्वथा सोडून दिलें पाहिजे.

कित्येक मांसाहारी मांस खाण्याला पुष्टि देण्यासाठीं असें देखील सांगतात कीं—'विधि रहित मांस खाऊं नये पण विधियुक्त मांस खाण्याला कोणत्याही तऱ्हेनी हरकत नाहीं.' हे त्यानें म्हणणें देखील अजीबात अयुक्तच आहे. मांस हें मनुष्यजातीनें नैसर्गिक अन्न नसल्यामुळें विधि युक्त अथवा विधि रहित—कोणत्याही प्रकारें मांस खाणें मनुष्य मात्राला योग्य नाही. जी वस्तु अग्राह्य ती अग्राह्यच राहणार जी विष्ठा मनुष्याला अस्पृश्य—अग्राह्य आहे ती विष्ठा कोणत्याही प्रसंगीं ( विधियुक्त अथवा विधिरहित प्रसंगीं ) स्पृश्य किंवा ग्राह्य होणें शक्य आहे काय? मांस देखील त्याच प्रमाणें आहे, व एवढ्या साठींच तर स्मृतिकार मनूंनीं मनुस्मृतीच्या पांचव्या अध्यायांत असें सांगीतलें आहे की —

> " समुत्पत्तिं च मांसस्य वधबंधौ च देहिनाम् ।
> प्रसमीक्ष्य निवर्तेत सर्वमांसस्य भक्षणात् " ॥ ४९ ॥

मांसाची उत्पत्ति अर्थात् शुक्र—शोणिताचा परिणामच मांस आहे म्हणून आणि जीव हत्येच्यावेळीं पशुला वध—बंधा पासून होणारें दुःख—त्याचा आर्तनाद वगैरे लक्षांत घेऊन सर्व प्रकारच्या मांसा-पासून मनुष्यांनीं निवृत्त झालें पाहिजे.

## काय मांस हा मातेचा ( देवीचा ) प्रसाद आहे ?

कित्येक मनुष्यें आपली मांस खाण्याची लालूच पूर्ण करण्यासाठीं मातेचा प्रसाद म्हणून—विधि असल्याचें दाखवून मांस भक्षण करितात, पण अशा विधियुक्त प्रसाद म्हणून मांसखाणाऱ्या मनुष्यांनी सुद्धा मांस भक्षण करूं नये म्हणूनच स्मृतिकार मनूनें सर्व हें विशेषण लाविलें आहे ही देखील विचार करण्यासारखी गोष्ट आहे कीं—जी मनुष्यें पशूंचा वध करून त्याचें मांस माते समोर ठेवतात त्या मांसाला मातेचा प्रसाद म्हणून म्हणतां येईल काय? माता काय तशा प्रकारच्या—पशूंच्या

मासाच्या–प्रसादाची इच्छा करते? कधींच नाहीं. माता तशा प्रकारच्या प्रसादाची मुळींच इच्छा करीत नाहीं व तो भक्षणही करीत नाही. देवतांची प्रवृत्तीच मासाहार करण्याची नाही. शंभर मण मास मातेला समर्पण केलें–माते पुढें ठेविलें–तर त्यातून एक रतीभर देखील मास माता ग्रहण करणार नाही. तसेंच माते समोर पन्नास बकरे उभे केले तर त्या पैकीं एकही बकरा कमी होणार नाही. यावरून असें नक्की होत आहे कीं मासाहारी लोक आपल्या इच्छा तृप्त करण्यासाठींच मातेच्या नांवचें निमित्त पुढें करून–विधियुक्त मास आहाराला योग्य आहे असें प्रतिपादन करून मातेच्या पवित्र नावाला कलंकित करितात.

आता ' तुष्यतु दुर्जनः ' या न्यायानें थोडा वेळ आपण असें गृहीत धरून चालू की माते समोर ठेवलेलें मास मातेचा प्रसाद आहे; तर येथें असा प्रश्न उपस्थित होतो की–मासाहार करणारे तें मास मातेचा प्रसाद आहे या बुद्धीनें भक्षण करितात किंवा तें मास आहे या बुद्धीनें भक्षण करितात? जर मास आहे समजून खात असतील तर मग प्रसादाचें नाव पुढें करणें अगदींच व्यर्थ आहे, व जर प्रसाद म्हणून भक्षण करीत असतील तर मग मासाचा त्याना मास म्हणून परिणाम न होता प्रसाद म्हणून परिणाम झाला पाहिजे. म्हणजे मासापासुन जें नुकसान होतें तें न होता प्रसादाचेंच फळ त्याना मिळालें पाहिजें. परतु तसें मुळींच होत नसून प्रसादाचें फळही त्याना मिळत नाही. प्रल्हादानें आपल्या भक्ति बळानें विषानें अमृत रूपानें पान केलें होतें त्यावेळी त्याच्या शरिरामध्यें विषाच्या शक्तीचा थोडा देखील परिणाम झाला नाही–इतकेंच नाहीं पण, विषाचा मसार देखील झाला नाही खरी भक्ति किंवा खरा प्रसाद म्हणतात तो हाच. जे मासाहारी मातेच्या समोर मास आणि दारू ठेवितात व प्रसाद म्हणून भक्षण करितात, त्याना त्या दोन्हीं वस्तू आपआपल्या दुर्गुणाचा परिणाम केल्याशिवाय राहत नाहींत. म्हणजे

भक्षणानंतर अथवा मांस खाऊन ते राक्षसासारखे किंवा रोगी झाल्याशिवाय राहत नाहींत व दारू पिऊन उन्मत्त झाल्याशिवाय ही राहत नाहींत म्हणजे दोन्हीही वस्तूंच्या दुर्गुणांचा परिणाम त्यांच्यावर होतोच होतो. मग तेथें मांसाहार अथवा मद्यपान मातेचा प्रसाद म्हणून कोठें राहिला?

## पशूंना होणारा त्रास.

आपणाला बरोबर ठाऊक आहे कीं, मनुष्याप्रमाणेंच पशूंना देखील आहार संज्ञा, भय संज्ञा, मैथुन संज्ञा, आणि परिग्रह संज्ञा आहेत. कोणत्याही प्रकारच्या संकटानें ज्या प्रमाणें मनुष्य भयभीत होतो व जसा त्याला त्या संकटा पासुन त्रास होतो, त्याच प्रमाणें पशूंना देखील संकटाची भीति वाटते, आणि संकटा पासुन त्रास होतो. जे पशूवध करितात त्यांना तर या गोष्टीचा अनुभव जरूर असलाच पाहिजे. पशूची जेव्हां अशी खात्री होते कीं मला मारण्याची तयारी होत आहे अथवा मला मारण्यासाठींच घेऊन जात आहेत तेव्हां त्याचें अंतःकरण इतकें कंपायमान होतें व त्याच्या शरीराच्या हालचाली इतक्या दयाजनक होत असतात कीं तें दृश्य सहृदय माणसानें पाहवत नाहीं ! तें भयंकर दृश्य पाहून दयाशील मनुष्य एक पाऊल देखील पुढे टाकूं शकत नाहीं तें फक्त महान् निष्ठुर हृदयाचाच मनुष्य करूं शकतो. यासंबंधी एका करुणाजनक घटनेचा उल्लेख **'वलिदानेर शास्त्रीय सिद्धांत'** नांवाच्या एका बंगाली पुस्तकांत करण्यात आलेला आहे. या पुस्तकात ' बलिदानात पशुहिंसा करूं नये अथवा न केली पाहिजे—' या विषयावरील काशी, कलकत्ता, नदीया—शान्ति वगैरे विद्येच्या केंद्रस्थानच्या विद्वानांनी व्यवस्थापत्रें देखील देण्यात आली आहेत. या विद्वानाच्या व्यवस्थापत्रापैकीं एका व्यवस्थापत्रात नवद्वीपाचे ( नदियाचे ) प्रधान नैयायिक **महामहोपाध्याय श्रीयुत राजकृष्ण तर्कपंचानन** यांनीं आपला अभिप्राय देताना असें म्हटलें आहे की —

"एई व्यवस्थापत्रे स्वाक्षर करिते आमार, को नः आपत्ति नाई"

अर्थात्—या व्यवस्थापत्रांत सही करण्याला आम्हाला कोणतीच हरकत नाहीं असें म्हणून, नंतर त्यांनीं उल्लेख केला आहे. त्यांनीं म्हटलें आहे कीः—" स्वर्गीय माधवचंद्र तर्क सिद्धांत महाशय एके कालीं नवद्वीपाचे प्रधान नैयायिक होते. त्यांनीं तयार केलेला न्याय शास्त्रावरील ग्रंथ अजून देखील शिकविण्यांत येतो. त्यांचे पुष्कळ धनाढ्य शिष्य होते. पुत्र, पौत्र दौहित्र वगैरे वंश पण विस्तृत होता. ते साळो-साळ दुर्गोत्सव फारच कडाक्यानें करीत असत. तर्क सिद्धांत महाशय माझे गुरू ( अध्यापक ) व मी त्या वंशाचा पुरोहित. दुर्गापूजेंत नित्यशः त्यांच्या येथें बकऱ्याचें बलिदान होत असे. सप्तमी पुजेच्या दिवशीं एक व अष्टमी तथा नवमीच्या दिवशीं जास्त बळी देण्यांत येत असत. एके वेळीं दुर्गापूजेला सप्तमीचे दिवशीं बलिदाना साठीं एक काळ्या रंगाचें हृष्ट पुष्ट, लहान वयाचें बकरें आणलें. तें बकरें षष्टीच्या दिवशीं लहान मुलां बरोबर आनंदानें नाचूं बागडूं खेळूं लागलें लहान मुलें त्या बकऱ्याला हिरवें गवत–दुर्वा बिल्वपत्रें वगैरे खाऊं घालीत तें तें खाई, अशा आनंदानें त्यानें षष्टीचा दिवस घालविला. एका दिवसांतच त्या बकऱ्यावर मुलांचें दृढ प्रेम जडलें. प्रात काळ होताच ढोल वाजूं लागला. बकऱ्याचें पोर–लहान बकरें–उदास वृत्तीनें चोहींकडे पाहूं लागलें, व मधून मधून थरथर कांपूं लागलें. लहान मुलें दुर्वा व बिल्व-पत्रें त्या बकऱ्याला खाण्याला देत–खाऊं घालीत–पण तें बकरें त्या दुर्वांना किंवा बिल्वपत्राना आज स्पर्श देखील करीना. दहा वाजतां सप्तमी पूजेच्या कार्याची समाप्ति झाल्यानतर बलिदानाचें कार्य होणार होतें. योग्यकालीं त्या लहान बकऱ्याला स्नान घालून एका लांब दोरीनें एका खुंटीला बांधण्यांत आलें. बकऱ्याचा वध करणार माणूस हातांत खड्ग घेऊन ज्या ठिकाणीं वध करावयाचा होता तेथें येऊन उभा राहिला,

खड्गाच्या पूजेला सुरुवात आली. नंतर बकऱ्याला सोडून आणून बलिदान व्हावयाचें तोंच एका मुलानें उत्साह भरांत येऊन कोणाचीही अनुमति घेतल्या शिवायच खुंटीला बांधलेली दोरी सोडून दिली. त्या सरसें तें बकरें त्या वेळीं कोठें दडून अथवा लपून बसलें याचा कांहींच पत्ता लागला नाहीं. दरेक मनुष्य व्यग्र चित्तानें चारी बाजूला बकऱ्याला पाहण्याला दौडादौड करूं लागला. परंतु त्या बकऱ्याचा कोठेंच पत्ता मिळाला नाहीं. या वेळीं तर्क सिद्धांत महाशय गंगास्नान करून अंगाला चंदन वगैरे लावून निमंत्रित मनुष्यांना आदर सत्कार करीत होते, ते ज्यावेळीं कित्येक माणसा बरोबर गोष्टी बोलत उभे होते, त्याच वेळीं तें लहान बकरें त्या मनुष्यांच्या गर्दींत सर्वांच्या डोळ्यांत धूळ टाकून त्यांच्याच पायाशीं दडून बसलें. इतक्या माणसांतून कोणीही त्या बकऱ्याला पाहिलें नाहीं अथवा तें कोणालाही दिसलें नाहीं. नंतर जेव्हां या माणसांना कळलें कीं बकरें पळून गेलें तेव्हां ते तेथून चालूं लागले. चालूं लागतांच तें बकरें त्यांच्या पायांत अडखळलें; खालीं पहतांच त्यांना तें बकरें दिसलें. त्या बकऱ्याला पाहतांच तर्कसिद्धांत स्तंभित झाला. दुःखी आणि भय पावलेलें बकऱ्याचें पोर एकाग्र चित्तानें व करुणाभावानें त्यांच्या डोळ्याकडे पाहूं लागलें. यामुळें तर्क सिद्धांताच्या हृदयानें पाणी आलें! त्याला त्या बकऱ्याची करुणा आली. तर्क सिद्धांताचें नेत्र अश्रूंनीं भरून आले. त्यांनीं आपल्या मुलाला बोलावून आणून सांगितलें -- " पशुबलि शिवाय देवीची पूजा होते हें मला ठाऊक आहे. आपल्या घरीं पशुबलि पूर्व काला पासून चालत असल्यामुळें आज पावेतों त्या कुलाचाराचा मी त्याग केला नव्हता. परंतु, जगज्जननी देवी मातेच्या कृपा प्रसादानें आज मला उत्तम शिक्षण मिळालें आहे. या दुःखा भीतिग्रस्त आणि शरणागत जीवाचा प्राणनाश मी करणार नाहीं,

तुम्ही देखील माझ्या समक्ष प्रतिज्ञा करा कीं- 'आम्ही देखील देवीच्या पूजेंत कोणत्याही कालीं पशुवध-पशुबलिदान-करणार नाहीं." पुत्रांनीं म्हटलें:-'हें काय? आपण ज्या गोष्टीचा निषेध करीत आहांत, ती गोष्ट आम्ही कोणच्याही कालीं केव्हांही करणें संभवित आहे काय? पितृ आज्ञेचें उल्लंघन कोण सुपुत्र करील? आम्हावर प्राणसंकट आलें तरी देखील आपल्या आज्ञेचें आम्ही उल्लंघन करणार नाहीं. आम्ही केव्हांही देवी पूजेंत पशुवध करणार नाहीं या विषयीं आपण खात्री असूंद्या." तर्क सिद्धान्त महाशयांनीं तें बकऱ्याचें पोर ज्याचें होतें त्याला परत दिलें. त्या बकऱ्या बद्दल दिलेली रकम देखील त्याच्या मालका पासून परत घेतली नाहीं. शिवाय त्या बकऱ्याच्या मालकाला असें सांगितलें कीं:-' तूं या बकऱ्याचें चांगल्या तऱ्हेनें पालन पोषण कर. कोणालाही तूं हें बकरें विकूं नकोस.' त्याच दिवसापासून तर्क सिद्धांत महाशयाच्या येथील शक्ती-पूजेंतून बकऱ्याच्या बलिदानाचें उच्चाटण झालें. बकऱ्याचा बली देण्याची चाल बंद पडली."

## काय तयार मांस खाणारे हिंसक होत नाहींत?

आतां मांसाहारी मनुष्यामध्यें दुसरा एक असा पक्ष आहे कीं जे स्वतः पशुवध करीत नाहींत, परंतु तयार मांस कसाई वगैरेंच्या दुकानावरून आणवून मांसाहार करितात, आणि या वरून आपण हिंसेच्या पापा पासून दूर आहोंत अशी ते आशा ठेवीत असतील तर त्यांचीही आशा पूर्ण होणें शक्य नाहीं. कारण या पूर्वीच सांगण्यांत आलें आहे कीं संसारांत पशुवधाची प्रवृत्ति मांसाहार करण्यासाठींच होत आहे. जर मांसाहारी नसतील तर जीवहिंसेची प्रवृत्तीच होणार नाहीं. म्हणजे जीवहिंसेचें मूळ कारण मांसाहारीच आहेत. या दृष्टीनें मांसाहारी जसें पापाचे वाटेकरी आहेत तसेंच शास्त्रकार देखील मांसाहार करणाऱ्यांस

घातकीच मानतात. स्मृतिकार मनू यांनीं मनुस्मृतीच्या पांचव्या अध्यायांत लिहिलें आहे कीं:—

" अनुमन्ता विशसिता निहन्ता क्रयविक्रयी ।
संस्कर्ता चोपहर्ता च खादकश्चेति घातकाः " ॥ ५१ ॥

अर्थात्—अनुमोदन देणार, पशूची हत्या करणार, मांस काटणार, क्रेता, विक्रेता, (घेणार, देणार, अथवा विकणार, व त्याचे तुकडे करणार,) शिजविणार, वाढणार आणि खाणार हे सर्व घातकी आहेत.

याच प्रमाणें महाभारताच्या अनुशासन पर्वांत देखील म्हटलें आहे कीं —

" आहर्ता चानुमन्ता च विशस्ता क्रयविक्रयी ।
संस्कर्ता चोपभोक्ता च घातकाः सर्व एव ते " ॥ ४९ ॥

अर्थात्—पशू हत्येसाठीं पशूला आणणार, अनुमति देणार पशूहत्या करणार, क्रयविक्रय करणार, शिजविणार आणि खाणार. हे सर्वजण पशूवध करणाऱ्या इतकेच म्हणजे घात करणाऱ्या इतकेच पातकी होतात.

यावरून स्पष्ट दिसून येईल कीं, कोणी मनुष्य स्वतः जीव हिंसा करीत नसला, पण मांस भक्षण करीत असला तरी देखील तो पातकी हा आहेच. अर्थात जशी वध करणाराची दुर्गती होते तशीच मांसाहार करणाऱ्याची होते, कारण मांस शब्दाचा अर्थच असें सुचवितो कीं —

" मां स भक्षयिताऽमुत्र यस्य मांसमिहाद्म्यहम् ।
एतन्मांसस्य मांसत्वं प्रवदन्ति मनीषिणः " ॥ ५५ ॥

अर्थात्—'ज्याचे मांस या जन्मा मध्यें भक्षण करीतों, तो दुसऱ्या जन्मीं मला अवश्य खाईल' असा 'मांस' शब्दाचा अर्थ मोठमोठ्या सत्पुरुषांनीं, ज्ञानी लोकांनीं तसेंच महात्म्यांनीं केलेला आहे व करीतही आहेत.

सांगण्याचें तात्पर्य असें कीं:—मांसाहारी मनुष्य मनुष्यजन्माची समाप्ति झाल्या नंतर—मृत्यु नंतर—पशु, पक्षी, मासे वगैरे सारख्या अनेक योनींत जन्म घेतो, व त्या योनींत दुसरे जीव त्याला भक्षण करितात. तेव्हां या जन्मांत तसेंच मृत्यु नंतरच्या जन्मीं म्हणजे इह परलोकीं सुखाची इच्छा राखणाऱ्यांनीं केव्हांही मांस भक्षण करूं नये, तसेंच जीव हिंसा देखील करूं नये.

## काय मांसाहार कुलधर्म होऊं शकतो ?

कित्येक मनुष्यें तर मांसाहार व जीवहिंसा हा आपला कुलधर्म आहे असें मानून मांसाहार आणि जीवहिंसा करण्याला प्रवृत्त होतात. परंतु त्यांचें तसें मानणें व्यर्थ आहे. ही गोष्ट खरी आहे कीं कुलधर्माचें पालन करणें हें फारच कठिण काम आहे. विद्वानांचें असें मत आहे कीं तीक्ष्ण असिधारेवरून चालणें, व्याघ्राचे कान मर्दन करणें, व हातानें सर्पाला धरणें हीं सर्व कामें सोपीं आहेत, परंतु कुलधर्माप्रमाणें आचरण करणें अत्यंत कठीण आहे. परंतु कुलधर्म म्हणतात तरी कशाला हें मात्र मनुष्यांनीं प्रथमतः समजून घेतलें पाहिजे. कोणी मनुष्य व्यभिचारी असेल तर त्याच्या पुत्रानें व्यभिचारी व्हावें याला काय कुलधर्म म्हणावयाचा ? एक मनुष्य पक्का चोर आहे तर त्याच्या पोरानें काय चोरीचाच धंदा केला पाहिजे ? कधींच नाहीं. मनुष्यांनीं बऱ्या वाइटाचा सारासार तात्विक व व्यवहारिक दृष्टया विचार करूनच प्रत्येक कार्यांत प्रवृत्ति करावयाची आहे. अज्ञान आणि मूर्ख मनुष्ये मदिरा, मांस वगैरे ज्या वस्तूंची धर्माचरणाचें अंग म्हणून गणना करितात त्या वस्तू धर्म आणि व्यवहार शास्त्रांत महा पातकी वस्तु म्हणून गणल्या जातात. जसें मद्य स्पर्श करण्या लायक आणि पीण्याला योग्य नाहीं, तसेंच मांस हें पण स्पर्श करण्याला लायक नसून खाण्याला देखील योग्य

नाहीं. मद्यपान करणें अथवा मांसाहार करणें तर दूरच राहिलें पण मद्य अथवा मांस यांच्या नुसत्या आलोचनानें देखील पाप लागतें. म्हणून मांसाहाराला कुलधर्म मानून त्या निमित्तानें मांसाहाराचा व्यवहार करणें उचित नाहीं.

## काय स्मृतिकार मनु मांस खाण्याला सांगतात ?

कित्येक मांसाहारी लोक असें उघडपणें प्रतिपादन करितात कीं मनूनें मनुस्मृतींत मांसाहार करण्यात कांहीं दोष नाहीं असें सांगितलें आहे. व या प्रतिपादनाच्या पुष्टीला ते मनुस्मृतींतील पांचव्या अध्यायांतील छपन्नाव्या श्लोकाला पुढें करितात. तो श्लोक असा आहे कीः—

" न मांस भक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने ।
प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला " ॥ ५६ ॥

वरील श्लोकाचा ते असा अर्थ करितात कीं—" मांस भक्षण करण्यांत दोष नाहीं, मद्यांत ( मद्यपानांत ) दोष नाहीं आणि मैथुनांत देखील दोष नाही. कारण कीं त्या मनुष्यांच्या प्रवृत्ति आहेत. जर त्यांच्या योगानें निवृत्ति झाली, तर ती महाफलदायक होऊं शकेल. "

हा अर्थ खरोखर पाहिला तर उचित दिसत नाहीं. मांस भक्षण, मद्यपान आणि मैथुन या मनुष्यांच्या प्रवृति आहेत तेव्हां त्यांत दोष नाहीं असें एके बाजूला सांगण्यात येते तेव्हां मग निवृत्ति टाळविण्याची गरजच कोठें राहिली ? म्हणजे जर प्रवृत्तींत दोषच नाहीं तर निवृत्तींत महाफल होईलच कसें ? अर्थात् जर प्रवृत्ति दोषमय असेल तरच निवृत्तीन महाफल दाखविता येईल. तेव्हां या श्लोकाचा खरा अर्थ काय आहे तो पाहिला पाहिजे. या

श्लोकाचा खरा अर्थ असा आहे कीं:—' न मांसभक्षणे दोषो ' या पदांत ' मांसभक्षणे ' आणि ' दोषो ' या दोन शब्दांच्या मध्यें व्याकरणाच्या नियमानें ' अ ' चा लोप झाला आहे. (' एदोतः पदान्तेऽस्य लुक्–सिद्धहेम १–२–२७ ) आतां याचा स्पष्ट अर्थ या प्रमाणें होतो:—" मांस भक्षणांत अदोष नाहीं, किन्तु दोषच आहे. त्याच प्रमाणें मद्य आणि मैथुन यांत पण अदोष नाहीं किन्तु दोषच आहे. कारण असें आहे कीं प्राणि मात्रांची ( अज्ञानजन्य ) प्रवृत्ति आहे. अथवा जर निवृत्ति होईल तर ते महाफलदायक होईल. " असा त्याचा वास्तविक अर्थ आहे. विचारा अंतीं उघड दिसतें कीं जर स्मृतिकार मनू मांस भक्षणांत दोष नाहीं असें मानीत असते, तर प्रथमतः दाखविलें आहे त्या प्रमाणें त्यांनीं केव्हांही सर्व प्रकारच्या मांसाहाराचा–मांस भक्षणाचा–निषेधच केला नसता. मांसाहाराच्या बाबतींत मनूनीं सर्वथैव निषेधच केलेला आहे आणि मनूच्या वरील श्लोकाला जे पुढें करून मांस भक्षणाच्या इच्छेची पूर्तता करितात, ते खरोखर त्या श्लोकाचा खोटा अर्थ करून एक भयंकर अपराध करितात.

## काय मत्स्याहारी सर्व भक्षक नाहींत ?

आतां पावेतों आपण जो मांसाहाराचा निषेध करीत आलों आहोंत, त्यांत मत्स्य ( मासळी ) आदींचा देखील निषेधच समजावयाचा आहे. कारण जे लोक मत्स्याहार करितात ते देखील माशाला मारल्या शिवाय मत्स्य–मांसाची प्राप्ति करूं शकत नाहींत. थोडा खोल विचार करून आपण पाहूं लागलों तर आपणाला असें दिसून येईल कीं मत्स्याहारी मनुष्यांच्या हृदयांत निष्ठुरता पुष्कळच असते; कारण मत्स्याचा जीव इतका कठीण असतो कीं तो मत्स्याच्या शरीराला एक-दम सोडून जात नाहीं. मत्स्याचे तुकडे केल्या नंतर ही आत्म प्रदेशांत

(कुडींत) जीव असल्यामुळें तुकडे देखील उसळ्या मारतात. केव्हांकेव्हां तर भांड्यांत ( शिजण्याच्या भांड्यांत ) टाकल्यावर देखील मत्स्य क्वचित उसळी मारतो. अशा जीवाला निर्दयतेनें मारणाऱ्या, त्याला शिजवून खाणाऱ्या माणसांची मनुष्यांत गणना होऊं शकेल काय ? जी माणसें स्वतःच्या शरीराला थोडी देखील तकलीफ अथवा इजा झाली म्हणजे हाय होय करितात, जिकडे तिकडे बोंबाबोंब मचवून देतात, ती माणसें दुसऱ्या जीवांना मारून टाकतानां थोडा देखील संकोच पावत नाहींत ही त्यांची केवढी मोठी निर्दयता ! शिवाय मत्स्य खाणार फक्त मासळीच खातो असें नाहीं पण तो सर्व तुच्छ वस्तूला देखील भक्षण करितो असें स्मृतिकार मनु पांचव्या अध्यायांत सांगतात —

" यो यस्य मांसमश्नाति स तन्मांसाद उच्यते ।
मत्स्यादः सर्व मांसादस्तस्मात् मत्स्यान् विवर्जयेत्" ॥१५॥

अर्थात्—यद्यपि जो पुरुष ज्याचें मांस खातो तो त्याचा भक्षक गणला जातो, परंतु माशांना ( मासळी ) खाणार तर **सर्वभक्षी** अथवा **सर्वभक्षक** गणला जातो. म्हणून मत्स्याहार अथवा मांस भक्षणाचा त्याग केला पाहिजे.

स्मृतिकार मनु यांचें वरील कथन सर्वथैव सत्य आहे. अमुक एका प्रकारचे मांस भक्षण करणार ज्या जनावराचें मांस आहे त्याचे भक्षक गणले जातात. परंतु मत्स्याहारी तर सर्वभक्षक गणला जातो. याचें असें कारण आहे कीं मत्स्य दरेक पदार्थ खातो. समुद्र अथवा नदी मध्यें वाटेल त्या जीवाचें प्रेत असेना मत्स्य तें खातात. इतकेंच नाहीं तर विष्टा आणि मूत्र हें देखील मत्स्य भक्षण करितात. आतां अशा या मत्स्यांना खाणारा मनुष्य **"सर्वभक्षी"** आहे असें म्हणणें हें सत्याला मुळींच सोडून नाहीं. म्हणून हिंदु अथवा मुसलमान कोणीही .

मत्स्याहार करणें उचित नाहीं कारण असें आहे की—" **मत्स्यमांसे सदा लुब्धो नरो निषाद उच्यते** " मत्स्य आणि मांसात लुब्ध अशा मनुष्याला मनुष्य नाहीं पण राक्षस म्हणून म्हणतात.

## जंगलांची शोभा कोठे गेली ?

अशा तऱ्हेनें जगात हिंसेची प्रवृत्ति मांसाहारा पासुनच होत आहे असें नाहीं, परंतु कित्येक शोका खातर देखील हिंसा करितात स्वतःच्या क्षणिक आनंदासाठी दुसऱ्या निर्दोष प्राण्याचा संहार करणें, अथवा त्या निर्दोष प्राण्याना त्रास देणें, हें तर त्यांच्या अंगवळणीच पडलें आहे जणु काय ते स्वाभाविकपणें अथवा सहजगत्या तसें करितात. याच भारतवर्षात अशी अरण्यें अथवा अशीं जगलें होतीं की जेथें एके काळी हजारो ससे अथवा अशाच तऱ्हेच्या निर्दोष जनावरांचे कळपाचे कळप दृष्टीस पडत होते. परंतु आता त्याच अरण्यात त्या निर्दोष प्राण्याचे कळप दिसत नाहीत किंवा पक्षाचा किलकिलाट पण ऐकू येत नाहीं ! याचें काय बरं कारण असावें ? कारण हेंच की तीं सर्व जनावरें—जगलात आनंद करणारी जनावरें—स्वतः फळें, फुलें वगैरे खाऊन दिवस गाळणारीं जनावरें—शिकार करणाऱ्यांच्या शिकारींत मारलीं गेली! शिकारी लोक तर आपल्या शोका खातर—क्षणिक आनंदासाठीच—त्या बिचाऱ्या गरीब, निर्दोष व सुंदर पशूंचा आणि पक्ष्यांचा संहार करितात ही गोष्ट अगदीं खरी आहे परंतु यात विशेष दुःखाची गोष्ट तर ही आहे की, ज्या क्षत्रिय जातीचा—नित्याचा—प्रधानधर्म—मुख्यकर्तव्य—म्हणजे जगातील सर्व जीवाचें रक्षण करावयाचें, व ज्या क्षत्रियाच्या हातातील शस्त्राचा उपयोग जगातील सर्व जीवाचें रक्षणच करण्या साठीं करावयाचा, तेच क्षत्रिय—वीर पुत्र—देखील निर्दोष आणि भयभीत प्राण्याचा संहार करण्यात पूर्ण गुंग झालेले दिसतात

इतकेंच नाहीं पण शिकारींत त्या निर्दोष प्राण्यांना मारणें—त्या निर्दोष आणि सुंदर प्राण्यांचा संहार करणें म्हणजेच मोठा पुरुषार्थ केला असें हे क्षत्रिय मानतात, व विनाऱ्या निर्दोष प्राण्यांची शिकार मिळाली म्हणजे आपल्या अचूक नेमाची स्तुति ऐकून ते आनंदाच्या लहरींत गर्क होतात! यालाच म्हणतात विचित्रता. ज्या प्रमाणें वणिकाच्या हातांतील लेखणी नीतीनें व्यवहार करण्या साठीं आहे, ऋषि मुनि-महात्मे-यांचीं शास्त्रें जगांतील जीवांना सन्मार्गावर लावण्या साठीं आहेत, त्याच प्रमाणें क्षत्रियांनीं आपल्या हातांत धारण केलेलीं शस्त्रें जीवांचें रक्षण करण्या साठीं आहेत. परंतु सध्यां जगाचा न्यायच उलटा होत चाललेला दिसत आहे. व त्या मुळेंच वरील प्रमाणें वर्तन होत नाहीं. असो. परंतु वणिक त्याच कलमेनें अनीति करतील अथवा ऋषि मुनि तींच शास्त्रें पुढें करून अधर्म फैलावतील तर त्यांना जसें आपण पातकी गणूं त्याच प्रमाणें जे क्षत्रिय आपल्या शस्त्रांचा उपयोग जीवांचें रक्षण करण्या साठीं न करितां जीव संहारा साठीं करतील तर तेही तसेच पातकी गणले जातील यांत तिळ मात्र देखील शंका नाहीं व नवल वाटण्या जोगें ही कांहीं नाहीं! कदाचित कोणी असें म्हणतील कीं 'जंगलांत हरीण वगैरे प्राणी खेतीवाडीला खराब करून टाकतात म्हणून त्याची संख्या कमी करणें जरूरीचें आहे' तर त्यांचें हें म्हणणें देखील खोटें आहे. ज्या वेळीं जगलचें जंगल अशा सुंदर आणि निर्दोष हरीणांच्या कळपानीं भरलेलें होतें त्यावेळेस काय अन्न-धान्य-पिकत नव्हतें? भारतवर्षांत असे अनेक राजे होउन गेले आहेत कीं ज्यांनीं आपल्या राज्यांत कोणत्याही प्रकारची जीवहिंसा न करण्या बद्दल हुकूम काढले होते. तेव्हा काय शेतकरी हात पाय जोडून स्वस्थ बसत होते काय? तें मुळी शेतात धान्यच पेरीत नव्हते? अथवा शेती करीत असतील तर त्यांची शेतेंच्या शेतें काय हरीण खाऊन जात होते व

त्यांच्या पदरांत पिकाना दाणाही पडत नव्हता ! खरें पाहिलें तर 'हरीण शेतीवाडीची खराबी करितात म्हणून त्यांचा संहार केला पाहिजे' ही सबब निवळ खोटी आहे; व ती आपल्या स्वार्थ सिद्धी साठींच पुढें करण्यांत येत आहे. वास्तविक असें आहे कीं जंगलांतील पशू अथवा प्राणी हे देखील पुण्यवान असतात व त्यांचें ही पुण्य वांटणीला आल्यानें शेतीवाडींत धान्य जास्त पिकतें. जीवांचा संहार करून जी मनुष्यें कोणत्याही प्रकाराची वृद्धि करूं पाहतात, अथवा इच्छितात तीं खरोखर सर्वथैव फसतात या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव आतां सर्वांना येत आहे. पहिल्या जमान्यांत जें धान्य एका शेतांत उत्पन्न होत होतें त्या प्रमाणांत—नेमकें—आतां त्या शेतांत धान्य उत्पन्न होत नाहीं, दिवसें दिवस तें कमी कमीच होत आहे. भारत वर्षांतील प्रजेचा सर्व आधार शेतीवरच राहिलेला आहे व आतां तर त्या शेतींत जवळ जवळ कांहीं देखील सत्व राहिलेलें नाहीं; आणि याचें कारण मनुष्यें निरनिराळ्या तऱ्हेनें जीवांचा संहार करितात हेंच होय.

## काय जनावरांची शिकार देश रक्षणाला कारणीभूत आहे ?

कित्येक इसम अशी सबब पुढें करितात की—' जर क्षत्रिय लोक शिकारीच्या द्वारें अचुक निशाण मारणारे होणार नाहींत तर ते देशाचें रक्षण कसें करूं शकतील ? शत्रूंच्या सैन्याच्या समोर कसे लढूं शकतील ? ' पण त्यांची ही सबब अजीबात लंगडी आणि कुच कामाची आहे. निशाण मारण्यांत निष्णात होण्या साठीं दुसरे अनेक मार्ग आहेत. कोणत्याही जातीच्या निर्जीव वस्तूला अमुक जागेवर ठेऊन त्या वस्तूवर निशाण मारण्यांत आलें तर त्याच्या योगानें अभ्यासही होतो व कोणत्याही जीवांची हिंसा पण होत नाहीं. पूर्वकालीन क्षत्रीय वीर याच प्रमाणें निशाण मारण्यात निपुण

होत असत. परंतु आता तो रिवाज, ती सुग्र व निरपद्रवी रीत अजी बात नाहींशी झाली आहे व त्यान क्षत्रियाचे वीरपुत्र प्रसगोपात स्वत च्या प्राणाला देखील सकटात गहून शिकारीच्या नादीं लागले आहेत—त्या क्षत्रियपुत्राना शिकारीचा शोक लागन चालला आहे शिकारी लोकाना पुष्कळ वेळा मोठ्या सकटात पडावें लागतें उलट कित्येक वेळा तर त्याच्या प्राणावरदेखील गदा येन एवढेंन नाहीं, पण प्रसगोपात कित्येक प्रसगी शिकार करणारे आपण स्वत च बळी पडले आहेत अशीं शेकडों उदाहरणें घडलीं आहेत, तरी देखील हे वीर–क्षत्रिय पुत्र–त्याना शिकारीची लागलेली चटक सोडीत नाहींत श्री रामचंद्रा सारखा अवतारी पुरुष देखील सुवर्ण मृगाच्या शिकारीला लागून आपल्या पत्नीला–सती सीता देवीला–गमावून बसला हें कोणाला माहीत नाहीं बरें ?

पापर्द्धि, शिकार, मृगया हे सर्व पर्याय वाचक शब्द आहेत हे शब्दच असें दाखवितात कीं–शिकारीमध्यें पापाची ऋद्धि आहे असें पाप ऋद्धीचें महान पाप कर्म करणें, हे प्रजा रक्षक क्षत्रियाना–राजा महाराजाना–कोणत्याही तऱ्हेनें उचित अथवा युक्त आहे किंवा साजेसें आहे असें म्हणनात येईल काय ? कधींच नाहीं मनुष्ये जशी राजा महाराजाची प्रजा आहे, तशीच जगलातील जनावरें देखील त्याची निर्दोष आणि दीन प्रजा आहे राजानें जसें मनुष्याचें रक्षण केलें पाहिजे तसेंच पशूचेंही रक्षण केलें पाहिजे

## क्षत्रियांचा उदारपणा.

एके बाजूला आपण राजे–महाराजे आणि क्षत्रिय याच्या उदार पणाचें अवलोकन करितो, व दुसऱ्या बाजूला जेव्हा आपण त्याच्या अशा अनुदार प्रवृत्तींचें निरीक्षण करितों, तव्हा आपणाला खेद झाल्या शिवाय रहात नाहीं एखाद्या राजावर दुसरा राजा आक्रमण करून

येऊन त्यानें त्या राजाच्या हजारो माणसांची कत्तल केली, व त्या राजाच्या लाखो रुपयांची राख रांगोळी करून टाकली, तर साहजिक त्या राजाला असेंच वाटतें कीं जर हा दुष्ट राजा आपल्या हातीं आला तर आपण त्याचे तुकडे तुकडे करून टाकूं. पण त्या वेळीं आक्रमण करून आलेला दुष्ट राजा दांतीं तृण धरून क्षण भरच कां होईना, त्या राजा समोर आला तर तो राजा उदार होऊन त्या आक्रमण करणाऱ्या राजानें केलेल्या दुष्ट कामाची, अनाचाराची आणि धनहानीची देखील पर्वा न करितां त्याला सोडून देतो. कारण शरण आलेल्याला मरण देऊं नये अशी क्षत्रियांची नीति आहे. तेव्हां असे हे उदार राजे-महाराजे अथवा क्षत्रिय, जे नेहमींच दांतीं तृण धरितात, गवत खाऊन रहतात, तसेंच जे मनुष्यांना सदासर्वदा भितात व भीतीनें पळून जातात-अशा शरणांगत व निरपराधी, निर्दोष आणि सुंदर जनावरांना मारतात तें मारणें सुद्धां केवळ शौकाखातर असतें-ही केवढी बरें शोचनीय गोष्ट आहे ! एवढ्या साठींच एका कवीनें पशुचा पक्ष घेऊन म्हटलें आहे कीं:—

> " वैरिणोऽपि विमुच्यन्ते प्राणान्ते तृणभक्षणात् ।
> तृणाहाराः सदैवैते हन्यन्ते पशवः कथम् ? " ॥ १ ॥

अर्थात्—वाटेल तसा शत्रु देखील जर क्षणभर दांतीं तृण धरून आला तर त्याला सोडून देण्यांत येते. तेव्हां जे पशु नित्य दांतीं तृण धरितात-म्हणजे ज्यांचा रोजचा आहार तृण-त्यांना कां बरें हनन करण्यांत येतें ?

खरोखर पाहूं गेलें तर निरपराधी जीवांचें रक्षण करावें हा तर राजाचा धर्म आहे. व या विरुद्ध वर्तन करणाऱ्या-अर्थात् निरपराधी जीवांना मारणाऱ्या क्षत्रियांच्या-राजांच्या पुरुषार्थाचा महात्मे लोक तिरस्कारच करितात. साधू पुरूष असें म्हणतात कीं:—

" रसातलं यातु यदत्र पौरुषं
कव नीतिरेषाऽशरणो ह्यदोषवान् ।
निहन्यते यद् बलिनाऽतिदुर्बलो
हहा ! महाकष्टमराजकं जगत् " ॥१॥

अर्थात्—ज्या अति दुर्बळ, निर्दोष आणि अशरण जीवांना बल-वान पुरुष मारतात, तो त्यांचा पुरुषार्थ रसातळाला जावो; व ही नीति तरी कोठली ? मोठ्या खेदाची गोष्ट आहे कीं हें जगत् अराजक झालें आहे !

यापेक्षां देखील पुढें महात्म्यानें हरिणाचा पक्ष घेऊन असें म्हटलें आहे कीः—

" पदे पदे सन्ति भटा रणोत्कटा
न तेषु हिंसारस एष पूर्यते ? ।
धिगीदृशं ते नृपते ! कुविक्रमं
कृपाश्रये यः कृपणे मृगे मयि " ॥ २ ॥

अर्थात्—हे क्षत्रियांनो ! हे राजांनो ! ठिकठिकाणीं, रणांत, उत्कट हजारो–लाखो शत्रू सुभटवीर उभे असतां, त्यांच्यां समोर उभें राहून तुमच्या हिंसेचा रस, तुम्हाला पूर्ण करितां येत नाहीं ? अर्थात् त्यांच्यां समोर उभे राहून व युद्ध करून जर तुम्ही तुमच्या पराक्रमाला दाखविलेत तर तें वाजवी अथवा युक्त आहे, पण कृपापात्र आणि कृपण अशा मज सारख्या दीन हरिणाची शिकार करून आपल्या हिंसारसाची पूर्णता करण्याला जर इच्छित असाल अथवा इच्छिता, तर हे क्षत्रियांनो अथवा राजांनो तुमच्या अशा दुष्ट पराक्रमाला धिःकार असो !

समर्थ शत्रूच्या बरोबर युद्ध करून त्याचा पराजय करणें याचें

गांव पुरुषार्थ. परंतु गवत खाण्या साठीं खालीं बघणाऱ्या, मनुष्यांनां पाहिल्या बरोबरच भीतीनें पळून जाणाऱ्या आणि आपलें दुःख दुसऱ्यांनां त्यांना सांगता येत नाहीं अशा निर्दोष आणि निराश्रित जनावरांना मारणें हें काय पुरुषार्थाचें लक्षण आहे ? असा देखील एक काल होता कीं त्या वेळीं राजेलोक शत्रू बरोबर युद्ध करून विजयादशमीच्या दिवशीं (दसऱ्याच्या दिवशीं) विजय प्राप्त करीत असत. त्यांच्या ऐवजी आतां तर कित्येक निर्दोष रेडे (हेले) किंवा बकरे यांना देवी समोर उभे करून तेच रणवीर त्या निर्दोष जनावरांची कत्तल करून, विजयलक्ष्मीनें माळ घातली म्हणून कपाळीं टिळा लावितात. ही देखील या जमान्याची बलिहारीच नाहीं तर काय ? तरीही एक प्रकारें एवढी संतोषाची गोष्ट आहे कीं आतां राजे–महाराजे आणि बरेचसे क्षत्रिय लोक आपला खरा क्षात्र धर्म कोणता हें समजूं लागले आहेत. आणि ठिकठिकाणीं वरील तऱ्हेच्या हिंसा बंद होत आहेत; पण अजून आर्यावर्तात शिकारी वगैरेंच्या निमित्तानें कांहीं कमी हिंसा होते असें नाहीं.

## उपदेशकांच्या स्वार्थवृत्तीचा परिणाम.

भारतवर्षांतील राजे–महाराजे आणि दुसरे क्षत्रिय लोक यांची शिकार वगैरे बाबतींत इतकी पुष्कळ प्रवृत्ति वाढत गेली, याला उपदेशक–धर्मोपदेशक देखील कारणीभूत झाले आहेत. राजे महाराजे यांच्या जास्त परिचयांत अथवा सहवासांत येणाऱ्या उपदेशकांनीं आपल्या स्वतःच्या स्वार्थसिद्धि साठीं राजा–महाराजांना खरा उपदेश दिलाच नाहीं व राजा–महाराजांची खुशामत करून ते ' जी–हां ' ' हां–जी '–करून होस हो करूं लागले. जेव्हां जेव्हां या उपदेशकांनीं उपदेश केला तेव्हां तेव्हां राजे–महाराजे यांना खुश ठेवण्या करितां, त्यांच्या मनाला अनुकूल असेंच सांगितलें; कीः–" महाराज ! अयं तु राज्ञां धर्मः " महाराज ! शिकार करणें हा तर राजाचा धर्म आहे. बस !

नैतिक नियम या प्रमाणें देखील राजा–महाराजांनीं कोणत्याच प्रकारच्या व्यसनांत पडूं नये. त्यांतूनही शिकारीच्या व्यसनापासून तर त्यांनं जरूर अलिप्त राहिलें पाहिजे.

कामा पासून उत्पन्न होणाऱ्या दहा व्यसनांची वर यादी दिलें आहे त्यांत देखील त्याच ठिकाणीं स्मृतिकार मनू यांनीं असें सांगितलं आहे कीः—

पानमक्षाः स्त्रियश्चैव मृगया च यथाक्रमम् ।
एतत्कष्टतमं विद्याचतुष्कं कामजे गणे ॥ ५० ॥

अर्थात्—मद्य आदि प्राशन करणें, जुगार खेळणें, स्त्रियांच्या ठिकाणीं आसक्त होणें, आणि शिकार करणें हीं व्यसनें जास्त कष्टदायक समजावीत.

विचारान्ती देखील असेंच ठरतें कीं मद्यादिकांचें सेवन, शिकार वगैरे व्यसनें जेव्हां सामान्य माणसांना महान् नुकसानकारक होतात तेव्हां राजे महाराजे यांच्या बाबतींत तीं व्यसनें अगदीं त्याज्य आहेत यांत नवल कसलें ? तीं त्याज्य नसलीं तर मात्र नवल म्हणावयाचें.

## कायद्यांत एका गोष्टीचा अभाव.

अतिशय आश्चर्याची गोष्ट आहे कीं, ज्या राजा–महाराजांचा धर्म आपल्या सर्व प्रजेला सुखी करण्याचा आहे, ज्यांचा धर्म आपल्या प्रजेला शांति व आराम देण्याचा आहे, ज्यांचा धर्म प्रजेचें रक्षण करण्याचा आहे, तेच राजे–महाराज आपल्या गरीब आणि अजीजी (प्रार्थना) देखील करूं शकत नाहींत अशा दीन आणि निर्दोष प्रजेला भीति दाखवितात, त्रास देतात, दुःखी करितात आणि शेवटीं त्यांना तीर अथवा गोळी घालून मारून टाकतात ! केवढा अनर्थ ! केवढा अन्याय !! केवढी अनीति !!! एका म- ष्यानें दुसऱ्या मनुष्याला फसवून दोन पैसे किंमतीची क्षुद्रक वस्तु घे-

तशी असली, अथवा एका मनुष्याने दुसऱ्या जीवाला—मनुष्याला थोडीशीच तक्लीफ दिली असली अथवा कोणा इसमाला साधी दुखापत केली असली तर त्या माणसाला गुन्हेगार म्हणून समजले जाते. तो सरकारचा अथवा राजाचा गुन्हेगार होतो व त्या मनुष्याला राजाच्या वतीने राजाचे प्रतिनिधि अथवा राजाचे अधिकारी कायद्याप्रमाणे शिक्षा करितात. परंतु स्वतः राजा, आणि त्याचे अनुचर किंवा त्याचे स्वजातीय इसम निर्दोष प्राण्यांचा संहार करितात त्यात त्यांना थोडा देखील अन्याय, अधर्म, किंवा अनीति आपण करीत आहोत असे वाटत नाहीं हें केवढें बरें आश्चर्य ? एका विद्वानानें एक वेळीं असें सांगितलें होतें कीं आजकाल सरकार अथवा राजानें केलेल्या कायद्यांत देखील अशाच प्रकारची विचित्रता दिसून येते. गाडींत जास्त बोजा—वजन भरणाऱ्याला सरकार गुन्हेगार ठरवून शिक्षा करितें. कारण गाडींत जास्त भार—वजन —घातल्यानें गाडी ओढणाऱ्या जनावराला तकलीफ होते व असें जास्त वजन भरणें एक प्रकारचें निर्दयतेचें कृत्य ठरविलें आहे. परंतु हें केवढें मोठें आश्चर्य आहे कीं त्याच पशूंचा प्राणनाश करणाऱ्यासाठीं, त्याच पशूंना कसायांना विकणाऱ्या साठीं सरकारांच्या कायद्यांत शिक्षा करण्याला एक देखील कलम नाहीं हें आश्चर्यच नव्हे काय ? भारतवर्षात एक काल असा होता कीं, भारतवर्षातील राजे आपल्या राज्यांत कोणत्याही प्रकारची प्राणी हिंसा—जीव हिंसा—करणाऱ्याला सर्वांत अतिशय कडक शिक्षा करीत असत; याचा परिणाम असा झाला होता कीं अकबरा सारख्या मुसलमान बादशहाच्या अमदानींत देखील जीवहिंसा पुष्कळच अंशानें कमी झाली होती. सध्यां जेव्हां आर्यावर्तातील कित्येक आर्य राजे—हिंदू राजे—महाराजे यांची स्वतःच हिंसेच्या बाबतींत प्रवृत्ति दिसून येते तेव्हां प्रजेवर या बाबतींत विशेष काय प्रभाव पडणार ?

"हवें होतें तों माहेरचें माणूस मिळालें ", किंवा "आवडत होतें तेंच वैद्यानें सांगितलें " या म्हणी प्रमाणें राजे-महाराजे त्या कार्यापासून निवृत्त न होतां, त्या कार्यांत पुढें पुढें सरसावत चालले. असें सांगतात कीं एक राजा एका ब्राह्मणा जवळून नित्य उपदेश श्रवण करीत असे. एके दिवशीं कारणवशात ब्राह्मणाला राजाकडे जातां आलें नाहीं; तेव्हां त्यानें आपल्या मुलाला राजा पाशीं पाठविलें. मुलानें आपल्या बापा प्रमाणेंच राजाला उपदेश ऐकविला. पण या उपदेशांत प्रसंगोपात त्यानें संत कबीर यांचें वचन देऊन असेंही सांगितलें कीः—

" तिलभर मछली खाय के कोटी गौ दें दान।
काशी करवट लें मरे तो भी नरक निदान " ॥१॥

अर्थात्—कोणी मनुष्य थोडा देखील मत्स्याहार करून, मग त्यानें कोट्यावधि गाईंचें दान केलें, किंवा तो काशींत शरीर करवतून घेऊन मेला तरी देखील तो नरकांतच जातो.

राजाला ही गोष्ट रुचली नाहीं; व म्हणून त्यानें असा निश्चय केला कीं उद्यां पासून आपणाला ब्राह्मणाचा उपदेश ऐकावयाचा नाहीं. दुसरे दिवशीं योग्यकालीं जेव्हां त्या मुलाचा बाप-ब्राह्मण राजा जवळ गेला, तेव्हां राजानें त्याला सांगितलें कीं " मला तुमचा उपदेश ऐकावयाचा नाहीं. " ब्राह्मणानें विचारलें-' महाराज ! असें का ! ' राजानें रागानें सांगितलें-'कां असें काय ! काल तुमच्या मुलानें सांगितलें कीं:-एखाद्यानें थोडा देखील मत्स्याहार करून मग कोट्यावधि गाईंचें दान केलें किंवा तो काशींत करवतानें कापून घेऊन मेला तरी देखील तो नरकांतच जातो. काय ? असला उपदेश ऐकण्या करितां मी तुम्हाला बोलावतों !' ब्राह्मणानें विचार केला कीं ही तर राजाच्या कडील भाकरी [illegible]. आतां राजाच्या येथील अन्नोदक-

संबंध नष्ट न व्हावा म्हणून काय बरें करावें ? थोडा विचार करून स्वतःचा मतलब साधण्या साठीं ब्राह्मणानें राजाला सांगितलें:—"महाराज ! माझ्या मुलानें आपणाला जें सांगितलें तें अगदीं सत्य आहे. मुलाचें असें सांगणें आहे कीं 'तिलभर' म्हणजे थोडी मासळी खाली तर नरकांत जातो. अर्थात् जो जास्ती मत्स्याहार करितो तो नरकांत जात नाहीं. हें नरकांत जाण्याचें विधान थोडी मासळी खाणाऱ्या साठीं आहे. जास्ती खाणाऱ्या साठीं नाहीं." ब्राह्मणानें आपलें पोट भरण्या साठीं—तसेंच राजाला खुशी राखण्या साठीं आपलपोटेपणा करून कसा व केवढा मोठा अनर्थ केला ?

अशा रीतीनें पुष्कळ स्वार्थी उपदेशक आपल्या स्वतःच्या स्वार्थ-सिद्धी साठीं राजा—महाराजांना खरा उपदेश करूं शकले नाहीं व खरा उपदेश करू शकत नाहींत आणि त्याचाच हा परिणाम झाला आहे कीं राजे—महाराजे त्या कार्यापासून—( शिकारीच्या अर्थात जीव हिंसेच्या कार्या पासून )—निवृत्त होऊं शकत नाहीत.

## राजांचे वास्तविक धर्म.

खरोखर पाहूं गेलों तर, राजे व महाराजे यांच्या मस्तकीं प्रजा रक्षण करण्याचें महान कार्य आहे; आणि म्हणूनच राजे—महाराजे यांच्या ठायीं केवढा दयाळूपणा, केवढी नीति प्रियता, आणि केवढी उदारता असली पाहिजे, हें सहज समजण्या सारखें आहे. जे राजे महाराजे शिकारींत आणि अशाच प्रकारच्या दुसऱ्या निंद्य कार्यांत आपला स्वतःचा समय घालवितात ते प्रजेचें रक्षण काय करणार होते ? त्यांच्यानें प्रजेचें रक्षण होणें शक्य तरी आहे काय ? धर्म शास्त्रकार तर असें सांगतात कीं राजे आणि महाराजे यांच्या ठिकाणीं अशा प्रकारचे उत्तमोत्तम गुण असले पाहिजेत कीं त्या त्यांच्या गुणामुळें आपल्या

समस्त प्रजेवर एका निराळ्या प्रकारचा प्रभाव पाडण्याला ते समर्थ असले पाहिजेत. धर्म शास्त्रकार त्यांबरोबरच राजा–महाराजांना शिकारी आदि निंद्य कर्मा पासून ही अलिप्त राहण्याला फर्मावितात. हिंदूंच्या सर्वमान्य मनुस्मृतीच्या ७ व्या अध्यायांत राजाचे धर्म सांगतांना दाखविलें आहे कीं:—

" इन्द्रियाणां जये योगं समातिष्ठेद्दिवानिशम् ।
जितेन्द्रियो हि शक्नोति वशे स्थापयितुं प्रजाः ॥४४॥
दशकामसमुत्थानि तथाष्टौ क्रोधजानि च ।
व्यसनानि दुरन्तानि प्रयत्नेन विवर्जयेत् ॥४५॥
कामजेषु प्रसक्तो हि व्यसनेषु महीपतिः ।
वियुज्यतेऽर्थधर्माभ्यां क्रोधजेष्वात्मनैव तु ॥४६॥
मृगयाक्षा दिवास्वप्नः परिवादः स्त्रियो मदः ।
तौर्यत्रिकं वृथाट्या च कामजो दशको गणः ॥४७॥
पैशुन्यं साहसं द्रोह ईर्ष्यासूयार्थदूषणम् ।
वाग्दण्डजं च पारुष्यं क्रोधजोऽपि गणोऽष्टकः" ॥४८॥

अर्थात्–राजा दरेक इंद्रियाला आपल्या काबूंत ठेवतो कारण कीं जितेन्द्रिय राजाच प्रजेला आपल्या ताब्यांत अथवा काबूंत ठेऊं शकतो (४४) शिवाय राजांनीं कामा पासून उत्पन्न होणाऱ्या दहा आणि क्रोधा पासून उत्पन्न होणाऱ्या आठ व्यसनांना सोडलें पाहिजे. न सुटतील तरी प्रयत्न करून देखील तीं व्यसनें सोडलीं पाहिजेत. (४५) कामजन्य व्यसनांत आसक्त होणार राजा अवश्य अर्थ आणि धर्म यांनीं हीन होतो; व क्रोधजन्य व्यसनांत आसक्त होणाऱ्या राजाचा प्राण देखील नाहींसा होतो–क्रोध जन्य व्यसनात आसक्त होणाऱ्या राजाचें जीवन देखील नष्ट होऊन जातें. (४६) काम

जन्य दहा व्यसनें खालीं दिलीं आहेत. शिकार करणें, जुगार खेळणें, दिवसा शयन करणें, दुसऱ्यांचे दोष सांगणें, स्त्रियांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवणें, निशाबाजी ( कैफ करणें ) नाचणें, गाणें, वाजविणें आणि कारण नसतां फिरत राहणें. क्रोधजन्य आठ व्यसनें यांचीही यादी खालीं दिली आहेः—चहाडी, साहस, द्रोह, ईर्ष्या, दुसऱ्यांच्या गुणांतील फक्त दोषच प्रकट करणें, दुसऱ्यांचें द्रव्य हरण करणें, कठोर वचन बोलणें, आणि निर्दोष मनुष्यांना ताडण करणें.

वरील व्यसनां वरून आपण सहज पाहूं शकतो कीं तीं व्यसनें सामान्य माणसांना देखील भयंकर अनर्थकारक होतात तेव्हां ज्यांच्यावर हजारो किंवा लाखो मनुष्यांच्या बऱ्या वाइटाची जबाबदारी आहे अशा राजा—महाराजांना तीं दुर्व्यसनें अवश्य महा अनर्थकारकहोतील यांत नवल तें कोणतें ? वरील व्यसनांत आसक्त झालेला राजा कोणत्याही काळीं देखील आपल्या प्रजेचें रक्षण करण्याचें तसेंच प्रजेचा सांभाळ करण्याचें जोखिमीचें कार्य करूं शकेल काय ? कधींच नाहीं. आपण पुष्कळ ठिकाणीं असें प्रत्यक्ष पाहिलें आहे कीं पुष्कळसे राजे महाराजे शिकारीचे इतके शौकी झाले आहेत कीं ते आपला रात्रीचा तसाच दिवसाचा वेळ शिकारींतच घालवितात. व अशा शिकारीच्या शौकी राजांचें शिकारीचें व्यसन अथवा शिकारीचा शौक इतका वाढला असतो कीं ते जेवावयाला बसले असतांना कोणी एखाद्या नोकरानें येऊन असें सांगितलें कीं अमक्या अमक्या जंगलांत शिकार आहे तर लागलीच भोजनाला रजा देऊन मोटार किंवा गाडी जोडवून तावडतोब जंगलांत शिकारीला निघतात.-या शिकारीच्या शौका मुळें हे राजे प्रजेचा बरोबर रीतीनें सांभाळ करूं शकत नाहींत व याचा असा परिणाम होतो कीं राज्यांतील दुसरे अधिकारी यांना प्रजेवर वाटेल तसा जुलूम करावयाला फावतें. म्हणून धर्मशास्त्र ...

नैतिक नियम या प्रमाणें देखील राजा–महाराजांनीं कोणत्याच प्रकारच्या व्यसनांत पडूं नये. त्यांतूनही शिकारीच्या व्यसनापासुन तर त्यांनीं जरूर अलिप्त राहिलें पाहिजे.

कामा पासून उत्पन्न होणाऱ्या दहा व्यसनांची वर यादी दिली आहे त्यांत देखील त्याच ठिकाणीं स्मृतिकार मनु यांनीं असें सांगितलें आहे कीं:—

पानमक्षाः स्त्रियश्चैव मृगया च यथाक्रमम् ।
एतत्कष्टतमं विद्याच्चतुष्कं कामजे गणे ॥ ५० ॥

अर्थात्—मद्य आदि प्राशन करणें, जुगार खेळणें, स्त्रियांच्या ठिकाणीं आसक्त होणें, आणि शिकार करणें हीं व्यसनें जास्त कष्टदायक समजावीत.

विचारान्ती देखील असेंच ठरतें कीं मद्यादिकांचें सेवन, शिकार वगैरे व्यसनें जेव्हां सामान्य माणसांना महान् नुकसानकारक होतात तेव्हां राजे महाराजे यांच्या बाबतींत तीं व्यसनें अगदीं त्याज्य आहेत यांत नवल कसलें ? तीं त्याज्य नसलीं तर मात्र नवल म्हणावयाचें.

## कायद्यांत एका गोष्टीचा अभाव.

अतिशय आश्चर्याची गोष्ट आहे कीं, ज्या राजा–महाराजांचा धर्म आपल्या सर्व प्रजेला सुखी करण्याचा आहे, ज्यांचा धर्म आपल्या प्रजेला शांति व आराम देण्याचा आहे, ज्याचा धर्म प्रजेचें रक्षण करण्याचा आहे, तेच राजे–महाराजे आपल्या गरीब आणि अर्जीजी (प्रार्थना) देखील करूं शकत नाहींत अशा दीन आणि निर्दोष प्रजेला भीति दाखवितात, त्रास देतात, दुःखी करितात आणि शेवटीं त्यांना तीर अथवा गोळी घालून मारून टाकतात ! केवढा अनर्थ ! केवढा अन्याय !! केवढी अनीति !!! एका ग्य प्यानें दुसऱ्या मनुष्याला फसवून दोन पैसे किंमतीची क्षुल्लक वस्तु घे-

तरी असली, अथवा एका मनुष्यानें दुसऱ्या जीवाला—मनुष्याला थोडीशीच तकलीफ दिली असली अथवा कोणा इसमाला साधी दुखापत केली असली तर त्या माणसाला गुन्हेगार म्हणून समजले जाते. तो सरकारचा अथवा राजाचा गुन्हेगार होतो व त्या मनुष्याला राजाच्या वतीनं राजाचे प्रतिनिधि अथवा राजाचे अधिकारी कायद्याप्रमाणें शिक्षा करितात. परंतु स्वतः राजा, आणि त्याचे अनुचर किंवा त्याचे स्वजातीय इसम निर्दोष प्राण्यांचा संहार करितात त्यात त्यांना थोडा देखील अन्याय, अधर्म, किंवा अनीति आपण करीत आहोंत असें वाटत नाहीं हें केवढें मोठें आश्चर्य ? एका विद्वानानें एके वेळीं असें सांगितलें होतें कीं आजकाल सरकार अथवा राजानें केलेल्या कायद्यांत देखील अशाच प्रकारची विचित्रता दिसून येते. गाडींत जास्त बोजा—वजन भरणाऱ्याला सरकार गुन्हेगार ठरवून शिक्षा करितें. कारण गाडींत जास्त भार—वजन —घातल्यानें गाडी ओढणाऱ्या जनावराला तकलीफ होते व असें जास्त वजन भरणें एक प्रकारचें निर्दयतेचें कृत्य ठरविलें आहे. परंतु हें केवढें मोठें आश्चर्य आहे कीं त्याच पशूंचा प्राणनाश करणाऱ्यासाठीं, त्याच पशूंना कसायांना विकणाऱ्या साठीं सरकारांच्या कायद्यांत शिक्षा करण्याला एक देखील कलम नाहीं हें आश्चर्यच नव्हे काय? भारतवर्षांत एक काळ असा होता कीं, भारतवर्षांतील राजे आपल्या राज्यांत कोणत्याही प्रकारची प्राणी हिंसा—जीव हिंसा—करणाऱ्याला सर्वांत अतिशय कडक शिक्षा करीत असत; याचा परिणाम असा झाला होता कीं अकबरा सारख्या मुसलमान बादशहाच्या अमदानींत देखील जीवहिंसा पुष्कळच अंशानें कमी झाली होती. सध्यां जेव्हां आर्यावर्तांतील कित्येक आर्य राजे—हिंदू राजे—महाराजे यांची स्वतःच हिंसेच्या बाबतींत प्रवृत्ति दिसून येते तेव्हां प्रजेवर या बाबतींत विशेष प्रभाव पडणार ?

## उपसंहार.

उपसंहारांत आतां इतकेंच मात्र सांगावयाचें आहे कीं जीवदया—अहिंसा—या समान कोणताही धर्म नाहीं. अहिंस उत्कृष्टता प्रत्येक धर्मांतील लोकांनीं स्वीकारलेली आहे ही गोष्ट सांगण्यांत आली आहे. कित्येकांनीं तर असें गृहितच धरलें ‘ अहिंसा परमो धर्मः ’ हें तर जैनांचें वचन आहे; व जैन या वचनाचें विशेष प्रतिपादन करण्यांत आलें आहे. परंतु आ दाखविलेल्या प्रमाणावरून व सांगितलेल्या वृत्तान्ता वरून खात्री झालीच असेल कीं जैन धर्मशास्त्रांतच नाहीं, पण हिंदु प्रमाणें दुसऱ्या धर्म शास्त्रांतून देखील जीव दयेचें—अहिंसेचें पादन करण्यांत आलेलें आहे. हिंदु धर्माचे कित्येक अनुयायी जे धर्म ग्रंथांत हिंसेचें विधान दाखविण्याला पुढें येतात त्यांच त्यांच धर्म ग्रंथांत हिंसेचा केवढा निषेध करण्यांत आला आहे या बाबत पुष्कळ प्रमाणें दाखविण्यांत आलीं आहेत; असें असून देखील सर्वमान्य महाभारताच्या अनुशासन पर्वाच्या सोळाव्या श्लोक फारच उपयोगी असल्यामुळें खालीं दिला आहे.

या श्लोकांत तर एथ पावेतों सांगितलें आहे कीं:—

> “ अहिंसा परमो धर्मस्तथाऽहिंसा परो दमः ।
> अहिंसा परमं दानमहिंसा परमं तपः ” ॥ ३७ ॥

अर्थात्—अहिंसा हा परम धर्म आहे, अहिंसा हा परम हे, अहिंसा हें परम दान आहे आणि अहिंसा हें परम तप

इतकेंच नाहीं परंतु त्याच्याही पुढें त्याच अनुशासन प र पावेतों दाखविलें आहे कीं.—

" एतत्फलमहिंसाया भूयश्च कुरुपुङ्गव ! ।
नहि शक्या गुणा वक्तुमपि वर्षशतैरपि" ॥ ४१ ॥

अर्थात्—हे कुरुपुङ्गव ! या अहिंसेच्या फलाचें किती वर्णन करावें ? जर कोणी मनुष्य शंभर वर्षें पावेतों त्याचें वर्णन करील, तरी देखील तो अहिंसेच्या फलाचें संपूर्ण वर्णन करण्याला शक्तिवान होऊं शकणार नाहीं.

सांगण्याचें तात्पर्य हेंच कीं—हिंदु धर्मशास्त्रांत देखील अहिंसेला—भूतदयेला—प्रधानपद दिलेलें आहे. जो मनुष्य अहिंसा धर्माचें—दया-धर्माचें—पालन करितो त्या मनुष्याला भवान्तरांत एवढें मोठें फल मिळतें कीं त्याच्या बरोबरीचें फल देणारी दुसरी कोणतीही वस्तु नाहीं. महाभारताच्या शांतिपर्वांत सांगितलें आहे कीं:—

" सर्वे वेदा न तद् कुर्युः सर्वे यज्ञाश्च भारत ! ।
सर्वे तीर्थाभिषेकाश्च यत्कुर्यात् प्राणिनां दया " ॥ १ ॥

अर्थात्—हे अर्जुन ! प्राण्याच्या ठायीं असलेली दया—जीवदया—जें फल देते, तें सर्व वेद देत नाहींत, सर्व यज्ञ देत नाहींत आणि सर्व तीर्थांचे अभिषेक पण देत नाहींत; म्हणजे जीवदयेपासून ज्या फलाची प्राप्ति होते तें फल वेदापासून मिळत नाहीं, यज्ञापासून मिळत नाहीं तिर्थाभिषेका पासून देखील मिळत नाहीं.

गोष्ट देखील खरीच आहे कीं संसारांत जेवढीं म्हणून धर्मकृत्यें करण्यांत येतात तीं सर्व अहिंसे साठींच आहेत. सत्य बोलणें अर्थात् खोटें न बोलणें, हें अहिंसे साठींच; चोरी न करणें हें अहिंसे साठींच, ब्रह्मचर्य पालन करणें अर्थात गृहस्थांनीं आपल्या पत्नीच्या ठिकाणींच संतोष ठेऊन परस्त्री सेवनापासून दूर राहणें हें अहिंसे साठींच; आणि संतोष ठेवणें—

लोभवृत्तिपासून दूर राहणें–हें देखील अहिंसे साठींच आहे. सांगण्य
तात्पर्य कीं–धर्मकार्यें, सत्कार्यें अहिंसा धर्माच्या रक्षणा स
आहेत. म्हणून प्रत्येक मनुष्यानें अहिंसा धर्माला–दया धर्माला–अ
अंतःकरणा पासुन केव्हांही दूर ठेवतां कामा नये. म्हणजे अहिंसा धर्म
सर्व तत्वें पूर्णपणें प्रत्येकानें आपल्या अंतःकरणाच्या ठिकाणीं बिंबवि
पाहिजेत. या अहिंसा धर्माचें पालन करण्यासाठीं मनुष्यांना दुसऱ्या अ
बाबतीवर लक्ष पुरविण्याची जरूरी आहे. कित्येक वेळा असें दृष
होतें कीं वरवर पाहिलें तर आपणाला एखाद्या बाबतींत हिंसा झाले
वाटत नाहीं, परंतु त्याचें बारकाईनें अवलोकन केलें म्हणजे
कार्यापासुन लाखो आणि कोट्यावधि जीवांची हिंसा होत अ
असें आपणाला दिसते. उदाहरणार्थ कित्येक विलायती औषधं
घ्याना. विलायती औषधीं मध्यें कित्येक अशा औषधीं आं
कीं ज्या गाईच्या मांसापासून, मत्स्यापासून आणि अशाच प्र
दुसऱ्या जीवांच्या मांसाच्या सत्वापासून तयार केलेल्या असत
या औषधी खऱ्या अहिंसा धर्माचें पालन करणाऱ्याला तर स्पर्श करण्
लायक देखील नसतात. असें असुन देखील या औषधींचा हिंदूम
जैनामध्यें आणि ज्या अहिंसा धर्म पाळण्यांत मशहूर आहेत अशा
दुसऱ्या जातींमध्यें इतका प्रचार दिसुन येतो कीं या औषधींच्या सेवनाच
निमित्तानें किती प्राण्यांची हिंसा होत असेल याचें अनुमान करणें देखी
अशक्य आहे. या औषधींना वापरणारे हिंसेला कारण आहेत असें म्ह
तर त्यात काय खोटें आहे? जी मनुष्ये एका शिवाला बांधविण्या करि
हजारो आणि लाखो रुपये खर्च करितात इतकेंच नाहीं परंतु धर्मरक्ष
आपला प्राण अर्पण करण्याला देखील तयार असतात, त्यात लोकास
हजारो, लाखो किंवा कोट्यावधि जीवांना वध होत आहे तर काय
इच्छा न करण्यासारखी गोष्ट नाहीं? म्हणून प्रत्येक जीवदयेच्या तत्व

ारानें—अहिंसा धर्माचा उपासक म्हणून प्रौढी मिरविणाऱ्यानें
प आणि अपेय वस्तू—औषधी—बिलकूल ग्रहण करूं नयेत.
र्थु ग्रहण केल्यानें एकतर आपला आत्मा अपवित्र होतो आणि
रच हिंसेला पण उत्तेजन मिळतें. म्हणून अशापासून सर्वथैव
ावें. अशाच प्रकारें ज्या ज्या कार्यांपासून हिंसेला उत्तेजन
त्या त्या सर्व कार्यांपासून जीवदया प्रतिपालक पुरुषांनीं सदा
दूरच राहिलें पाहिजें. जेव्हां मनुष्य आपल्या अंतकरणांत
मवत् सर्व भूतेषु " या सर्वमान्य सिद्धांताची संपूर्ण तऱ्हेनें
करितो तेव्हांच तो या दया धर्माचें—अहिंसा धर्माचें—बरोबर
न करूं शकतो. म्हणून दरेक मनुष्याला नम्रतेनें अशी विनंती
येत आहे कीं त्यानें ' आत्मवत् सर्व भूतेषु ' या भावनेची
दृढ स्थापना करून, जीव दयेचें—अहिंसा धर्माचें—प्रतिपालन
र्थी खालील श्लोक आपआपल्या हृदय पटलावर खोदून ठेवावाः—

अहिंसा प्रथमो धर्मः सर्वशास्त्रेषु विश्रुतः ।
यत्र जीवदया नास्ति तत्सर्वं परिवर्जयेत् ॥ १ ॥ "

